# नवभारत

## या अंकात




वर्ष २७

अंक चौथा

जानेवारी १९७४

रु. १–२५


अनुक्रमणिका











नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष सत्ताविसावे
अंक चौथा

# नवभारत

जानेवारी १९७४

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. मे. पुं. रेगे का. संपादक



वार्षिक रु. १२ अंकास रु. १·२५

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता :

१ संपादकीय : कार्यकारी संपादक, ‘ नवभारत ’ मासिक,
प्राध्यापकांचे निवासस्थान
कीर्ति कॉलेज, दादर-मुंबई २८

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ‘ नवभारत ’ मासिक,
C/o दी प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमराववाडी, मुंबई २ फोन नं. ३५४८५४

प्रा. हरिहर चंद्रशेखर थोंगे

# ज्ञानदेवसंशोधन-- सहजयानीप्रभाव.

## ( उत्तरार्ध )

निळावर्ण —

ज्ञानदेवांचे नीलवर्णाचे आकर्षण देखील वज्रयानी वा सहजयानी तंत्रातून त्यांनी मनाला लावून घेतले असावेसे दिसते. वज्रयानात ज्या अनेक देवदेवतांचा प्रवेश झाला त्यातील नैरात्म्य नावाच्या देवतेचा रंग निळा असून नैरात्म्य हे प्रज्ञातत्वाला दिलेले नाव आहे. नीळवर्णी प्रज्ञा ह्याच ज्ञानदेवांच्या अभंगातील नीळवर्णी गोपी असून बोधितत्वाशी वा उपायाशी तिचा समागम झाल्या-नंतर जी महासुखाची अवस्था प्राप्त होते त्या सुखाला 'गगनसम' अशा दृष्टांताने सरहपाद व त्यांच्या पंथातील वज्रयानी, सहजयानी सिद्धांनी समजावून सांगितले. 'प्रज्ञोपायाच्या' सुखानंतर प्राप्त होणारी अवस्था शून्यसम असून ती 'खसम' वा गगनसम असते असा विचार सरहपादांच्या दोह्यातून व सिद्धांच्या चर्यागीतीतून प्राप्त होतो. सरहपाद म्हणतात 'सूण्णहि सज्झे सुण्ण पउ, । तहि सन्धाण पइसरइ ।। सव्वधम्मजे खसम करीहसि । खसम सहावेचित्त दृठविहसी ।। (१५५)." शून्यामध्ये चित्ताचे अनुसंधान कर, सर्वधर्म गगनासम शून्य कर. आणि गगनसमान चित्ताची स्थापना कर. सरहपादांचे गगनाचे प्रतीक चर्यागीतीकारांनी अधिक स्पष्ट केले आहे. महासुखाचा परिणाम बघायचा असेल तर 'सुनुपाख भिडि' असे लुईपाद म्हणतात. (चर्या १). 'खसम बीजं यत् खसमं याति' (चर्या २४) अशी योग्याची महासुखाची अवस्था कृष्णचार्यपादांनी व्यक्त केली आहे. " तैलोपाद म्हणतात 'चित्त खसम जहि समसुह पइटठ्इ ( पच्छति ) । इन्दीअ विसअ-तहि मत्तण दीसइ ।' भुसुकपाद म्हणतात 'उइत्ता गअण माझे अदभूआ । पेखरे भुसुकु सहजसरुआ ।।' ( चर्या ३० ) महीधरपादांनी गगनसुखाची अवस्था वर्णन करताना म्हटले आहे 'मातेल चीअ गजेन्दा धावइ । निरन्तर गअणन्त

तुसे घोलइ ॥ ( चर्या १६ ) त्यावर टीकाकार म्हणतो 'स एव प्रमत्तो हि चित्तगजेन्द्रचन्द्रसूर्यदिवारात्रिविकल्पं वोलयित्वा गगनोपदेशचतुर्धानन्दोपदेशं गृहीत्वा गच्छतीति महासुखसरसि निरन्तरम् ॥' 'काळा पुरुष तो हा गगनात गांदे' असे ज्ञानदेव म्हणतात. पण निळ्या वर्णाचा दृष्टान्त देताना ज्ञानदेव म्हणतात :

'निळिये निकरे कामधेनु मोहरे।
निळेपण सरे निळे नभी ॥ १ ॥
घुमत घुमत निळेमाजी मातु ।
निळेपणी देतु क्षेम कृष्णी ॥ २ ॥
निळिये सागरी निळे निळेपण सुंदरी ।
रातलिसे हरि विरहिणी ॥ ३ ॥
ज्ञानदेव सांगे निळियेचे बागे ।
निळासंगे ओळले गे निळीमाजी ॥४॥ (अभंग २७०)

—ज्ञानदेवाची निळी मूर्ती हृदयात आहे आणि ती त्यांना प्रेमरसात बुडी देत आहे. 'निळिये मंडळी नीळवर्ण सावळी। तेथे वेधलिसे बाळी ध्यानरूप ॥ (अभंग ३२४) 'सदोदित नयनी नयन हारपे। निळ्याचे स्वरूप मनी वसो।' अशा रीतीने ज्ञानदेवांची अभिव्यक्ती नीळवर्णाभोवती रंगून जातेच पण अहंतेच्या निर्मूलनानंतर निरंजनी सोहं अवस्था प्राप्त होते असे सांगून ज्ञानदेव म्हणतात, सोहं वस्तू निळी अहं गेलीया। आनंद झालिया महाकारणी ॥' ज्ञानदेवांनी निवृत्तीची शपथ घेऊन सांगितले असते की आत्मज्ञानाची या परता वेगळी खूण नाही. (अभंग. ८२७) 'आकाश असे हे माझे शिर बापा ( ७९८ ) अशा अभिव्यक्तींचा अर्थ समजून घेण्यासाठी सिद्धांचे 'गगन', 'खसम' ही महासुखाची प्रतीके लक्षात घ्यावी लागतात. गगनाचा वर्ण निळा असतो. महासुखाची अनुभूती ज्ञानेशांनी याच रंगात व्यक्त केलेली आहे. 'निळावर्ण ब्रह्मरंध्र येक निके' ( अभंग. ७९७ ) ज्ञानदेव म्हणतात 'मीच माझा डोळा मीच शून्यात निळा. ( अभंग ८२८) 'शून्याची वोवरी सुनिळ प्रभा' महासुखाचे वर्णन करताना ज्ञानदेवांनी निळ्या रंगाचे दृष्टांत दिले आहेत.

### नाथांच्या उलट्या खुणा

पाताळाची गंगा शिरावर न्यायची; मनाचे उन्मन करावयाचे. बलिवर्दाने प्रसूत व्हायचे. इत्यादि ज्या रहस्यमय रचना आहेत त्यांना 'नाथांच्या घरच्या उलट्या खुणा' असे म्हणतात. अशा रचनात 'पाण्याला तहान लागते.' ज्ञानदेवांनी

या रचना नाथपंथीयांपासूनही उचलून घेतल्या असाव्यात. निवृत्तिनाथांच्या नाममुद्रेवर असणाऱ्या रचनांतून अशा रचना आढळत नाहीत. त्याअर्थी निवृत्तींचा गुरुप्रसाद लाभण्याचे आधीच ज्ञानदेवांना या रचना सिद्धांच्या गीतमाध्यमातून ज्ञात असाव्यात. अशा रचना गोरखनाथांच्या सबदीतही आढळतात. पण 'गोरख बानीत' त्यांचे प्रमाण फारच अल्प आहे. गोरखनाथ आणि ज्ञानदेव यांनी या 'उलटवासी' पद्धतीच्या रचना सहजयानी सिद्धांपासून उचलून घेतल्या असाव्यात असे म्हणावे लागते. गोरख म्हणतात 'पाताल की गंगा ब्रह्मांड चढाइबा। तहां बिमल बिमल जल पीया.' 'मनाचे उन्मन' करण्याची ही प्रक्रिया यौगिक प्रक्रिया आहे हे लक्षात येतेच पण या पेक्षाही कूट वाटणाऱ्या ज्ञानदेवांच्या अभंग रचनांचा अर्थ सिद्धांच्या चर्यागीतांतून स्पष्ट होतो.

ढेण्ढणपादांची ही एक रचना आहे

'टालत मार घर नाहि पडवेशी' (चर्या ३३)उंच नगरीत माझ्या घरापाशी शेजारी नाही. उंच नगरीला गगनमंडळ असेही म्हणता येईल. गगनमंडळ गोरक्षनाथांचा आवडता शब्द आहे. गगनमंडळात चंद्र आणि सूर्य देखील विझून गेले आहेत आणि आता एकाकी शून्य अशी अद्वय अवस्था प्राप्त झाली आहे असे या सिद्धांना सांगायचे आहेच पण पुढे हा सिद्ध म्हणतो 'बलद बिआल गविआ बांझे ॥' बैल प्रसूत झाला आणि गाय वांझ आहे. बैल हा मांसदेह असून त्याची प्रसूती हा आभासच होय. भ्रम होय. आभासात्मक सृष्टी अशीच रचलेली आहे. गाय वंध्या आहे. नैरात्म्याला वा शुद्ध चित्‌शक्तीला वा प्रज्ञेला गाय म्हटले आहे की काय ते न कळे. कारण भुसुकपादांनी अन्य एका रचनेत 'बान्धि सुआ जिम केली करइ खेलइ बहुविह खेला' (चर्या ४१) असा भाव व्यक्त केला आहे. वन्ध्यासुत नानाप्रकारचे ज्याप्रमाणे खेळ खेळतो यांत वंध्यासुत 'भगवती नैरात्म्यदेवीचा सुत' होय असे टीकाकार म्हणतो. गाय हे शून्यतेचे प्रतीक असावे पण ती प्रज्ञेचे प्रतीक असावे; हे अधिक बरोबर वाटते. ज्ञानदेव म्हणतात 'आकाशी मळा लाविला वा एक। वांझेचे बाळक शिंपितसे' (७५१) परमपद शून्यस्वरूपी आहे. आणि जे दिसते वा इंद्रियगोचर आहे ते कांही खरे नव्हे. म्हणूनच 'सांडि माया मोह द्वंद्व दुराशा' हे द्वंद्व सांडून निर्द्वंद्व अशा अवस्थेला येणे आवश्यक आहे. कारण खरे सांगावयाचे म्हणजे 'स्वप्नीचे धन ते धनची नव्हे। मृगजळीचे जळ ते जळची नव्हे । अग्नीची छाया ते छायाची नव्हे ।' (अभंग ८८७) मत्स्येंद्रनाथ ज्ञानकारिकेत सांगतात 'कल्पनाज्ञानयुक्तास्तु भ्रमन्ति घटयन्त्रवत् ।' विषयाचे सुख हे

सुखच नव्हे असे सांगून ज्ञानदेव म्हणतात ‘ तैसे विषय सुख सुख नव्हे रया। स्पर्शें मतंग दीप्ती पतंग ।। ‘ मी माझे म्हणता संसारी गुंतले । ’ अशी ज्ञानदेवांची जाणीव आहे. मत्स्येंद्रनाथ ज्ञानकारिकेत स्पष्ट करतात ‘ धर्म्माधर्म्म द्वय: पाशो पतन्त्युत्पतन्ति च। तेन पाशेन बद्धस्तु भुञ्जते कर्म्मसंचयम् । धर्माधर्म्मं यदा त्यक्तं क्षिप्रं मुञ्चति मानवा: ॥ अशी अभिव्यक्ती देतात. ‘ एतद्द्वन्द्वसमा-ख्यातं संसारस्य तु निर्णयम् ’ मत्स्येंद्रनाथांच्या या वचनाप्रमाणेच ज्ञानदेव म्हणतात ‘दुजेपणाचा भावो वाया वाढविसी गव्हारा ॥ उतराइ या देहा कैसा होशील ॥ (८९२ ॥) सहजसुखाची व्याख्या शून्यसम आहे म्हणून ती त्याज्य करणे योग्य नाही. ‘ वायूने वळावे, धूमे मिळावे अभ्रे पाणीये गळावे । आकाश पोकळ म्हणुनी क्षोभा जाउ नये ’ ( ९१४ ) वाऱ्याने ढग वळवून अभ्रांनी पाण्याचे सडे शिंपल्यानंतर आकाश निरभ्र झाले म्हणून त्याचा क्षोभ धरावा काय ? कारण ‘ निराळ निराळ सहज ते निराळ ते क्षीर चातका दुभे. ’ ॥ केळी पोकळ म्हणोनी सांडशील ज्ञणे तंव फळवरी निवांत राहे रे रे । नाही नाही म्हणोनी भरटिसी ज्ञणे नाही ते तेथेची पाही रे । ’ केळीचा गाभा पोकळ म्हणून त्याग करशील तर तेथे महासुखाचे फळ मिळणार कसे. शून्याचा तू शोध घेतला नाहीस. भ्रांतीने राजहंसासारखा स्फटिकावर झेपावत गेलीस, भ्रमाने पाषाणाचे चुंबन घेतलेस आणि तेथेच चोच अडकून पडलास (८८६) ‘ रत्नाचिया आशा घात झाला जया राजहंसा ज्ञणे भुलो नको ते सारे रे ।।९१४।। ’ वांझ अपत्याजवळी । वांझ क्रीडा विनोदे रळी (९२९) अशी या वांझ संसाराच्या खेळाची गती आहे. मनाची सृष्टी स्वप्न वर्तवी दृष्टी । अळंकारले उठी गंधर्वनगर ॥ तेथेचिये राणिवेसाठी । कां भ्रमु धरितोसी व्यर्थ (९४९) असे ज्यावेळी ज्ञानदेव विचारतात त्यावेळी सिद्धांच्या रचनांचे स्मरण होते. सिद्धांच्या उलटचा वासी सारख्याच ज्ञानदेवांच्या विपुल रचना आहेत ‘ खोकरी आधन ठेविले । तेथे न दिसे माझी भ्रक । इंधणावीण पेटविले । तेथे चुली नाही राख ॥ १०१८।। पौर्णिमेच्या दिनी चंद्र अकळी जाहला ॥ अमावस्ये ठेला पूर्ण कळी ।। संसाराची पूर्णीमा फुलली की महासुखाचा चंद्र लोपतो आणि जिथे शून्य असते तिथे मात्र सहजानंदाचा चंद्र फुलला असतो. ‘ मातेचिये पोटी पीता जन्मला । नवलाव जाहला काय सांगो ’ वास्तविक माया हीच परमेश्वराची कन्या पण मायेमुळेच परमेश्वराचे सगुणध्यान जन्माला आले. ’ (१०६२) दुसऱ्या एका कूटात ज्ञानदेव या जगाचा पसारा, शब्द, श्रुती हे सारे अविद्येच्या पोटी निर्माण होतात ह्याचे रूपक सांगताना म्हणतात, ‘ वांझेचिया पोरा तिघे झाले लेक । पारधीशी निघाले देख ते । उर्ण तंतु दोरा जाळे केले

त्याचे । डोही मृगजळाचे धरिले मच्छ। नेले अंधापाशी मुके बोले त्याशी। दिले थोटयापाशी ठेवणे ते। ज्ञानदेव म्हणे केले अविद्येचे। संतासी तयाचे स्मरण नाही।' (१०६३) अविद्येचे खेळणे हे असे आहे. जसे वांझेचे लेकरु सशाच्या शिंगाने खेळते किंवा वाळूचे तेल काढते तद्वतच हा खेळ आहे. उगमेवीण पाणी वाहते सारणी। शिंपीती माळिणी वेळोवेळा ॥१॥ नसे माळिणीचा मळा नसे सरोवर तळे। नित्यवेळोवेळा फुलतसे ॥२॥ ज्ञानदेव म्हणे ही खूण जाणा। षण्मास साजणा सूटि दिली ॥३॥ (१०८६).

जिथून ह्या भ्रमाला वाट सापडली त्याला उगम नाही कारण ते शून्यसम आहे. असे असूनही या प्रज्ञा नावाच्या माळिणीने वेळोवळी पाणी घालून हा भवाचा मळा फुलविला आहे. पण खरे म्हणजे तो मळाही भ्रमात्मक आहे. तिने ज्या इंद्रियांचे पाणी घेतले तेदेखील अस्तित्वात नाही. (मृगजळाच्या सरोवरात मासे मारण्यासारखेच) पण मळा मात्र वेळोवेळी फुलतो. भवाचा पसारा वाढतो. तात्पर्य मुळात शून्य असणाऱ्या नैरात्म्य नावाच्या देवीने वा प्रज्ञेने हा भ्रमात्मक भवपसारा निर्माण केला आहे असे ज्ञानदेवांना म्हणावयाचे आहे. हे रूपक समजून घेण्यासाठी वज्रयानी वा सहजयानी तत्वज्ञानात प्रज्ञेचे कार्य समजावून घेणे आवश्यक आहे. बौद्धतंत्रात प्रज्ञा आधारहीन आणि शून्य स्वरूपी आहे. तिला 'हे वज्रतंत्रात' जननी म्हटले आहे तसेच दुहिता म्हटलें आहे.

'जननी भन्यतो प्रज्ञा जनयति यस्मात् जगज् जनम्
गुणस्य दुहनात् प्रज्ञा दुहिता च निगद्यते ॥'

– ती निवृत्त स्वरूपाची आहे. तिला बोधिसत्वाची माता आणि भार्या म्हटले आहे. अशाच कल्पना हिंदु तत्वातही साकार झालेल्या आहेत पण ज्ञानदेवांनी प्रज्ञोपायांची रूपके बौद्धतंत्रातूनच उचलून घेतली आहेत याला आधार कोणता? त्याचे उत्तर देणे शक्य आहे.

हिंदु तंत्रातील मूळ तत्व पुरुषलिंगी आहे. आणि उपाय मात्र स्त्रीलिंगी आहे. ज्ञानदेवांचा विठ्ठल 'माउली' आहे. ज्ञानदेवांच्या अभिव्यक्ती स्त्रीच आहे. ज्ञानदेवांसमोर 'हे वज्र तंत्रासारखे' वा 'गुह्यसमाजासारखे' सुलभ भाषेत विरचित असणारे बौद्धतंत्र ग्रंथ असावेत असे म्हणता येते. ज्ञानदेवांच्या अभंगातील गूह्य, वज्र, शून्य हे शब्ददेखील त्यांचा संबंध विज्ञानवादाशी प्रस्थापित करतात. 'म्या देखिले पां मज। गुह्यांचे गज।' (१०८४)

'पुत्रें मायेसी पव पाजिले की पितयासी कडे वाहिले।
तुम्ही म्हणाल शास्त्रे काय देखिले तरी उजुचि आहे बोलिले।
साही शास्त्रे अठरा पुराणे यामध्ये नाही बोलिले ॥
शास्त्रगूढ अध्यात्मगूढ वज्रगुटी पाहे म्हणितले रे रे ॥ १०७९ ॥
– तात्पर्य गूढ अभिव्यक्तीला जाणून घेण्यासाठी सहा शास्त्रे आणि पुराणे यांची साक्ष घेण्यापेक्षा वज्राची साक्ष घे असे ज्ञानदेव सांगतात.

प्रज्ञा जशी माता आहे तशीच ती भगिनी आहे. 'भगिनी तथा 'प्रज्ञा' विभागम् दर्शयेत् यथा. ॥ अशी 'हे वज्रतंत्रात' व्याख्या आहे. ज्ञानदेव म्हणतात :

'ऐसा गे माये कैसा योगी। जे ठाई जन्मला तो ठाव भोगी ॥ १ ॥
माय कुमारी बाप ब्रह्मचारी। एकवीस पुत्र तियेचे उदरी ॥
आचार सांडुनी जालासे भ्रष्ट। माउलीशी येणे लाविलासे पाट ॥
आणि मी नवल सांगो कांही। येणे बहिणी भोगिली एकेचि ठायी ॥
ज्ञानदेव म्हणे अनुभवी जाणे। अनुभवावाचुनी कांहीच नेणे ॥
(अभंग १०७७)

– सहजसुख अथवा निरंजनाचा अनुभव घेण्यासाठी मनाचे उन्मन करणे आवश्यक असते. पाताळाची गंगा आकाशात न्यावी लागते.' 'ज्ञानदेव म्हणे उरफाटे पाहता। सर्व सौख्यदाता निवृत्ती एक ॥" दृष्टी उफराटी करून बघायची असते 'उफराटी देखे दृष्टी उन्मनीवरी। तेव्हा निर्विकारी मीच एक ॥ (८२८) उन्मनीचा घाट चढूनच ब्रह्माचे दर्शन होईल. (७५२)

परमपदाला ज्ञानदेवांनी शून्य अथवा निरंजन अशा शब्दांत गौरविले आहे. नाथांनाही हे निरंजनत्व प्रिय होते. 'सुण्ण निरंञ्जण परमपउ' असे सरहपाद म्हणतात. (दोहा १३९) हे निरंजनतत्व जाणून घ्यायचे असेल तर 'चैतन्याशेजारी मन पै मुराले।' (४१३) अशी अवस्था यावी लागते. कारण 'लाउनी मनगणीची दोरी। विपरीत तयाची कुसरी। अकळु न कळे श्रीहरी। अवघड अवडंबर तुझे।' (२६) या मनाच्या दोरीने श्रीहरीचे स्वरूप कळणार नाहीच; म्हणुनच 'मनाचा अंकूर उगमीच मेला। तो कृष्णचि होउनिया ठेला अनुभविया।' मनाचा अंकूर उगमातच जर मरून कृष्णरूप झाला तर ज्ञानदेव म्हणतात, 'तये पदांबरीचे रज। तेणे तृप्ती वो सहज ॥ असा सहज सुखाचा अनुभव मिळतो' (अभंग २७).

निरंजनस्वरूप गुणातीत आहे. 'गुणचि नाही त्यासी काय लाउ गुण। अतीत निरंजन देखिला वो माय ।। जरी पाही तरी वो डोळियांसी अरुवार। सेउ म्हणो तरी पारु न कळे खेवा वो माय (४९८) म्हणून निरंजनात वास करणारा हा विठ्ठल उगाच नावारूपाने आळविण्यापेक्षा आहे तसाच जर माझ्या हृदयात ठेवला तर मग 'सहजी सहज स्थिती जाती वो माय' (४९९) असे ज्ञानदेव सांगतात. ज्ञानदेव म्हणतात, प्रज्ञेला निरंजनात मी नेले आणि निराकार झाले.

'कवतुक पाह्या निरंजना गेलीये । तव निराकार जाले बाइये (५८०) निरंजनाचे स्वरूप वर्णन करता येत नाही म्हणुनच मौन धरावे लागते.

'पाहीन मी आता निरंजन स्वरूपता ।
त्याने मज तत्वता वोजविले माय ।। (३६८)

पण हे निरंजन स्वरूप पाहिल्यानंतर ज्ञानदेव म्हणतात : 'कळवळुनी भेटी प्राणेसी देईन मिठी । मी निःशब्देसी गोष्टी सांगेन माय ।।' 'पुरे पुरे वो आता जिणे निमाले । मज निरंजनी आफाविले गोंदले वो माय.'

'यथा कुमारी सुरतं सखीमुखात्' हा जो दृष्टान्त मागे दिलेला आहे तशीच ज्ञानदेवांची अभिव्यक्ती आहे. 'निरंजनं तत् सहजं गतद्वयम् । महासुखं तत् खसमं (नीळवर्णी) ह्यचित्तकम् ।। ततो हि मौनाः परमार्थदेशने । तथागता यान्ति मुनित्व भाजनम् ।।' अशी प्रस्तावना चर्यागीतीकोशातही दिलेली आहे. (पान ३९).

भुसुकपाद म्हणतात 'जइ तुम्हे अहेरि जाइबे मारिहसि पञ्चजणा नलिनीवन । पइसन्ते होहिसी एकुमणा ।। चर्या २३ ।। 'पंचजनांना मारुनच हरिणीला नलिनीवनात एकमनाने प्रवेश करता येईल कारण 'माआजाल पसरिउ रे बांधिल माआहरिणी।' मायाजालाने हरिणी बद्ध आहे. ज्ञानदेव म्हणतात. 'निरंजन वना गेलिये साजणी । तेथे निर्गुणे माझ्या मनी वेधियेले। बापरखुमादेविवरु विठ्ठलु सहज सावला। निर्गुण दाविला विसुरा गे माये ।। ३ ।। (अभंग २६०७) भुसुकपादाचे नलिनीवन हेदेखील निरंजनवनच आहे कारण त्यावरील संस्कृत टीकाकार म्हणतो 'पश्चात् वज्रपातेन द्वैतदृष्टि निरुध्य.. गुरुप्रसादात् महासुखचक्रनलिनीवनं प्रविशति। होहिसि एकुमणा इति विकल्पविरहः ।।' 'मृग हा चारियारे अतिमाने सोकला। अविचार बुद्धि त्याची परतोनी मागुती आला। तव त्या पारधियाने गुणी बाणु लाविला। आशा रे त्यजूनिया थिता प्राण मुकला' (१००२). या 'मदालसा' मथळचाखालील रूपकोक्तीत

भुसुकपादांच्या रचनेचा भास होतो. ज्यावेळी ज्ञानदेव म्हणतात 'तारु हारपले मृगजळी ।' त्यावेळी त्यांची रचना सहजयानी प्रभावाखाली असते असेच जाणवते. कारण सहजयानात 'उपायाला' वा करुणेला नौका म्हटले आहे. ध्येय, ध्याता आणि ध्यान ही त्रिपुटी संपल्यानंतरच ज्ञानदेव म्हणतात 'झालो निरंजनी अती लीन. (७४२)

## शून्यत्व

ज्ञानदेव वेदान्ती नसून शून्यवादी सिद्धान्ती होते हे शोधण्यासाठी त्यांच्या अभंगातून शून्याचा जो सर्वदा उल्लेख होतो त्याची वाट पडताळून बघावी लागेल. ज्ञानदेवांचा सहजयानी पंथ सेश्वर स्वरूपाचा असल्यामुळे त्यांचा वापरखुमादेविवरू शून्यातीत आहेच पण ज्यावेळी परमपदाविषयी ज्ञानदेव रचना करतात. त्यावेळी ते शून्याच्या भाषेतच अधिक वेळ बोलत राहतात.

'जेथे शून्यचि मावळले तेथे काय उरले !' असा प्रश्न करून ज्ञानदेव म्हणतात 'हाती घेउनिया दिवटी लागिजे अंधारापाठी । अंधार न देखे दृष्टि उजियेडु तो (३७८). 'शून्यापरता आदिअंतु नाही' परमपद शून्य स्वरूपी आहे असे ज्ञानदेवांचे मत असून ते पुढे म्हणतात 'सर्ववृत्तीशून्य म्हणे तोचि धन्य ! ज्ञानदेव सौम्य सर्वस्वेसी ॥' (५९१) माझा देह सगुण आहे पण शीर्ष मात्र निर्गुण आहे असे सांगताना ज्ञानदेवांना 'खसम' अवस्था मान्य असावी असे वाटते कारण 'शून्यातील सारे चराचर हे' असे ज्ञानदेव म्हणतात (८०४) 'औटपीठावरील चार देहावर जीवांच्या चार अवस्थांचा विलय झाल्यानंतर शून्य ज्योती निःशंकपणे प्रकाशत असते.' (८०७) शून्याच्या भुवनातच अविनाशी स्वरूपाच्या त्या परमपदाचा निळा रंग डोळ्यास आलेला आहे. तेच शून्य योग्यांचे बीज आहे. 'शून्याचे जे बीज तेच योगियांचे गूज' अशी ज्ञानदेवांची अभिव्यक्ती आहे. पण निवृत्तिनाथांनी शून्याची जी कल्पना सांगितली तिचे तर नागार्जुनाच्या शून्यत्वाशी विलक्षण साम्य आहे. असे वाटते की ह्या अभंगाकाराने नागार्जुनाच्या माध्यमिक कारिकेचाच अनुवाद केला आहे. नागार्जुन म्हणतात.

> सर्वं च युज्यते तस्य शून्यता यस्य युज्यते ।
> सर्वं न युज्यते तस्य शून्य तस्य न युज्यते ॥

– शून्य शोधिले नाही जेणे। काय विवरण केले त्याने। वर्णाकृती शून्याकार। हा नाही ज्या विचार। न घडे साक्षात्कार। जाण सर्वथा तया नरा। आधी





शून्याची शोधणी केली। मग सद्वस्तु प्राप्त झाली। शून्यवर्णाचा निळा। अव्यक्त तेजाजा ओतिला गोळा। ऐसे शून्याचे नाही ज्ञान। तंववरी अवघेच अज्ञान.।।'

हा अभंग ज्ञानदेवांचा असावा ह्याविषयी संशय येतो कारण 'जनी अवघा जनार्दन। अज्ञान सज्ञान काय बोलु। अशा मुद्रेने जनीजनार्दनाचे नाव लक्षात घ्यायचे तर 'निवृत्तिराजे बोलविली बोली। तेची बोलि बोलिलो।।' (अभंग ७४३) या दुसऱ्या नाममुद्रेवरून या अभंगकाराने निवृत्तीचे तत्त्वज्ञान सांगितले असेच दिसते त्यावरून ज्ञानदेवांचा शून्यवादी पक्ष अप्रत्यक्षपणे स्पष्ट होतो.

पण विठ्ठलाविषयी बोलताना मात्र ज्ञानदेव विठ्ठलमूर्तीला शून्यातीत म्हणतात. 'नवा आत ओवळी औटपीटा जवळी। शून्यातीत काळी सुकुमार। (७८४) किंवा बापरखुमादेवीवरु शून्याहुनी वेगळे' (१०७१). ज्ञानदेवांच्या या भूमिकेची संगती लावणे आवश्यक आहे. व्यावहारिक जगत् भ्रमात्मक असून तो शून्यरूपी प्रज्ञेचा विलास आहे असे वज्रयानी वा सहजयानी तंत्रातील विचार आकळून घेत असता ज्ञानदेवांना प्रज्ञेचा आधार शोधावयाचा असावा असे दिसते. आणि हा आधार विठ्ठलाच्या काळ्या मर्तीत त्यांनी शोधला असावा व ह्या शोधातच ज्ञानदेवांचे सहजयान सेश्वर झाले असावे. कारण 'शिव, शक्ती.' वा 'प्रज्ञा आणि उपाय' किंवा 'नैरात्म्य आणि बोधीचित्त' यांना जन्माला घालणारी एक शून्यातीत परा शक्ती – जी शून्याच्या निळ्या-वर्णापेक्षाही गहिरी असावी असे त्यांना वाटते. म्हणून शून्यातीत अशी नीळ-वर्णातील काळी सुकुमार विठ्ठलमूर्ती त्यांच्या अंतरात अधिष्ठित झालेली असते. ज्ञानदेवांचे सप्तक हेदेखील विज्ञानवादातूनच स्पष्ट होऊ शकते.

> गहिनीनाथ सांगे निवृत्तीचे कानी
> पावले ते ज्ञानी सिद्ध पंथे.
> ज्ञानदेव म्हणे गूह्य हे सप्तक
> अनुभवावू लेख पाहिलिया (अभंग ४२९)

डॉ. प्र. न. जोशींनी गुह्य सप्तकाची फोड करण्याचा प्रयत्न केला नाही. पण विज्ञानवादाचा वा योगाचाराचा शोध घेतला तर 'लंकावतारसूत्रा-सारख्या' योगाचारी ग्रंथातून हे सप्तक लक्षात येण्यासारखे आहे. पंचेंद्रियविज्ञान, मनोविज्ञान, आणि विज्ञान अशी ती सात तत्त्वे असून वसुबंधूनी विज्ञानालाच एकमात्र तत्त्व कल्पून त्यालाच 'आलयविज्ञानाची' जागा दिलेली आहे. या सप्ततत्वांनीच सेन्सेशन, थिंकिंग आणि परसेप्शन्‌ची प्रक्रिया होत असावी.

विज्ञानवाद्यांचे नैरात्म्य जसे शून्य आहे तसेच बोधिसत्व वा उपायाचेही स्वरूप शून्यच आहे.

'निःस्वभावं निरालम्बं सर्वशून्यं निरालयम्
प्रपञ्चसमतिक्रान्तं बोधिचित्तस्य लक्षणम् ॥ '

– अशी व्याख्या नैरात्म्यपरिपृच्छा सूत्रात (श्लोक १२) दिलेली आहे. बौद्धतंत्रातील देवता शून्याच्या अवतार होत. म्हणून त्यांचे कोणत्याही स्वरूपात प्रगटीकरण झाले तरी शेवटी त्यांचे स्वरूप शून्यत्वाचेच असते. 'स्फूर्तिश्च देवताकारा निःस्वभावा स्वभावतः । यथा यथा भवेत् स्फूर्ति सा तथा शून्यात्मिका ॥ ' (अद्वयवज्रसंग्रह). ज्ञानदेवांनी रखुमा-देविवरूला कधी शून्याचे ठायी नीळवर्णात वा कधी शून्यातीत काळ्यावर्णात प्रतिष्ठित केले आहे. बंगालात धर्मठाकूर हा जसा शून्याचे मानवी (Anthropomorphic) स्वरूप होते तसेच महाराष्ट्रातील विठ्ठल हे देखील शून्याचेच दैवत प्रतीक होते. पांचध्यानी-बुद्धातील 'अक्षोभ्य बुद्ध' हा विज्ञानस्कंधाचा दृश्यावतार असून त्याचा वर्ण निळा होता. ज्ञानदेवाचा रखुमादेविवर हा अक्षोभ्य-बुद्धाचे स्वरूप असावा. हिन्दु तंत्रांनी पुढे ज्यावेळी अक्षोभ्य हे नाव शिवाला दिले त्यावेळी बौद्धाची अक्षोभ्य नीळवर्णी पांडुरंगाची मूर्ती नामदेवाचे कालखंडात शंकराची मूर्ती म्हणून स्वीकारली गेली.

वज्रयानी बौद्धांनी, आणि त्यामुळेच वज्रयानातून उद्भवलेल्या सहजयानात शून्य तत्वांना देवतांचे स्वरूप दिले असले तरी वज्रयानी वा सहजयानी साधना ही मूर्तिपूजेभोवती घुटमळत नव्हती हे लक्षात घेण्यासारखे आहे.

'चित्त देव जे सकल राज्जइ ॥ '

– सकळ देवतांचे अधिष्ठान चित्तातच असते असे सरहपाद सांगतात पण सरहपादांचे हे मत त्यांचे शिष्य मत्स्येन्द्र ह्यांनी रचलेल्या 'कौलज्ञाननिर्णय' या पोथीतून अधिक विस्तारून सांगितले आहे. 'कौलज्ञाननिर्णय' वा 'अकूलवीर तंत्र' सहजानंदाचेच प्रतिपादन करतात. बौद्धतंत्रातील देवतांना हिंदु तंत्रात शंकर पार्वतीची वस्त्रे देऊन झाकळून टाकले ही लबाडी लक्षात न घेतल्यामुळे श्री. रा. चिं. ढेरे सारखे संशोधक मत्स्येन्द्राच्या कौलमार्गाची चूक व्याख्या करतात आणि त्यांना शाक्त तंत्रात समाविष्ट करण्याचा प्रमाद करतात.[१] कौलज्ञानात जो शिवशक्तियोग सांगितला आहे– तो उमाशंकर योग नसून प्रज्ञा आणि उपायालाच शक्ती व शिवाची संज्ञा देण्यात आली आहे. गोरखोपनिषदात

१. गुरु गोरक्षनाथ. रा. चिं. ढेरे. पान. ८१–८२.

देखील भेदाभेदरहित अचिन्त्य वासनायुक्त जीव होय. 'तौ कुल मार्ग कहियौ। और समस्त वासनारहित भग है अंतःकरण जिनके- ऐसे जीव जोग भजन से आवतु है .ऐसो मार्गन अकुल मार्ग है'[1] अशी व्याख्या दिलेली आहे. त्यात शिवशक्तियोगाचा निर्देश नाही. कौलज्ञाननिर्णयातच महायोगिनी कौलात-- 'कुलपञ्चशिकामूलं' असे ज्यावेळी म्हटले जाते त्यावेळी पांचध्यानीबुद्धाची कल्पना कौलज्ञानात अंतर्भूत असते. ( पटल २१ श्लोक ३ ). एवढेच नव्हे तर 'सिद्धेश्वरं तथा चान्यं कौलं ते वज्रसम्भवम्' ( श्लोक ७ ) या पंक्तीवरूनही वज्रयानातील पाचध्यानी बुद्धाच्या कुलकल्पनेचा आश्रय घेऊनच मीनपादांनी (मत्स्येंद्राचे शिष्य ) कौलागमाची व्याख्या केली आहे. 'कौलमार्गे द्वयो सन्ति कृतका सहजा तथा' असे ज्यावेळी मीनपाद 'अकुलवीर तंत्रात' ( ब--श्लोक ५·३ ) म्हणतात त्यावेळी कौलमार्ग सहजानंदी मार्ग आहे हेही स्पष्टच होते.

सहजन्तु इमं चक्रं वज्रनामातिकोद्भवम् ।
वज्रयोगप्रयोगेण वज्रवद्भवते नरः ॥ १० ॥[2]

किंवा

वज्रवत्तिष्ठत देहं संहारन्तु न हि प्रिये ॥ २५ ॥

अथवा

इमन्तु गूढ सद्भावं मम गुह्यं प्रगोपितम् ( ॥ २७ ॥ )

--अशा श्लोकांतून आणि 'परमवज्रीकरणं नाम पंचदशः पटलः ।' या उपसंहारातून कौलमार्ग हा वज्रयानी, सहजयानी मार्ग आहे हे लक्षात येते.

अकूलवीर तंत्राचा प्रस्ताव करताना मीननाथ म्हणतात 'सहजानंदं स्वकीयाङ्गसमुद्भवम्' हा सहजानंद ज्या अकूलवीर तंत्रात सांगितलेला आहे तोदेखील सिद्धनाथांनी सांगितला आहे. एवढेच नव्हे तर तो गुह्यतर आहे ( १.२ ).[3] अकुलवीराचा मार्ग सहजानंदी आहे 'सहजानन्दं न विन्दन्ति सर्व्वधर्म्मसमासृताः ॥' ( श्लोक. ५ ) आणि पुढे 'भावाभावविनिर्मुक्त उदयास्तमनवर्जितः। स्वभावमतिमतं शान्तं मनो यस्य मनोमयम् ॥ अकूलवीरमिति ख्यातं' असाही बोध करून दिलेला आहे. ( श्लोक १४–१५ ) 'अकुलवीरं स्थितं .... परमामृतसन्तृप्ताः सहजानन्दं च केवलम् ॥ ( अकूल-वीरतंत्र

१. सिद्धसिद्धान्त पद्धती. डॉ. कल्याणी मल्लिक. गोरखोपनिषद. पा. ७४.

२. कौलज्ञाननिर्णय. पटल पंधरा.

३. अकूलवीरतंत्र-अ.

बी-श्लोक. १४० ) अकूलवीर मार्ग श्रेष्ठ कसा सांगताना मीननाथांनी जे निरनिराळे पंथ वर्ज्य ठरविले आहेत त्यातही —

'एभिः शैवागमैः सर्व्वैः परोक्षञ्च क्रियान्वितैः
सविकल्पसिद्धिसंचारं तत् सर्व्वं पापबन्धवित् ।
विकल्प बहुलाः सर्वेमिथ्यावादाः निरर्थकाः ॥ '[१]

— अशी शैवागमाचीही जेथे संभावना केली आहे तेथे कुल आणि अकुल पंथाला शैव वा शाक्त तंत्रात ठेवण्यात श्री. रा. चिं. ढेरे यांचे प्रतिपादन उथळ असावेसे वाटते. मत्स्येंद्र अथवा लुइपा, मीननाथ हे सरहपादांच्या परंपरेतील साधक असून मत्स्येन्द्रांची गुरुपरंपरा आदिनाथापासून म्हणजे सरहपादापासून प्रारंभ होत असावी असे दिसते. बाराव्या शतकात आदिनाथाला शंकर संबोधण्यात आले असावे. सरहपादांनी दिलेले सहजयानी तत्वज्ञानाचे मार्ग वज्रयानातील अध्यात्म आणि जीवन आदर्श ह्यांना सोबत घेऊन मत्स्येन्द्रांच्या कौलागमातून व मीननाथांच्या अकुलमार्गाने सिद्धांचे गुह्य तत्वज्ञान घेऊनच नेवासे आळंदीला आले. आळंदी हे ग्रामनाम देखील 'आलयानंदी' या विज्ञानपंथातील अंतिम तत्वाच्या अभिधानाने साकार झालेल्या नामाचा अपभ्रंश होय असेही लक्षात घ्यावे लागते. ज्ञानदेवांनी जिथे गीताभाष्य रचले त्या नेवाशाला जी मोहिनीराजाची मूर्ती होती ती 'महालयाची' म्हणजेच अमृत कुंभ धारण केलेल्या 'लोकेश्वराची' मूर्ती असावी. 'वज्रयानी' तंत्रात निरनिराळ्या आध्यात्मिक प्रतीकांना देवत्वाचे स्वरूप दिले गेले होते हे जर ध्यानात घेतले तर 'महालया' हे 'आलय विज्ञानाचे' दैवत प्रतीक असावेसे वाटते. महालयाच्या शेजारी असणारी 'रसेशानी' ही देखील नागार्जुनाच्या माध्यमिक तत्वातील देवता होती हे सिद्ध आहे. तात्पर्य ज्ञानदेवांचा परिसर हा मध्ययुगीन महाराष्ट्रात विज्ञानवादी वज्रयानी व सहजयानी तंत्राने भारलेला होता असे दिसते. उत्तरकालीन श्रौतस्मार्त पंथीयांच्या ग्रंथात बौद्ध देवतांना हिंदु दैवताचे पांघरूण घालण्यात आले. महालयाच्या हातातील अमृतकुंभ बघून त्याचे भोवती देवदानवाच्या समुद्रमंथनातून वीष पळवून नेणाऱ्या मोहिनीची कथा गुंफण्यात आली. महालया आणि रसेशानी हे बोधिचित्त आणि प्रज्ञा या दोन तत्वांची दृश्य दैवत स्वरूपे असावीत -ह्याची मात्र विस्मृती झाली.

मच्छिद्रांचा कौलागम व मीननाथांचे अकुलवीर तंत्र शैवतंत्र नसून ते मुळात बौद्ध सहजयानी तंत्र आहे हे ध्यानात घेतले तर त्यातील जो पूजाविधी

१. अकूल वीर तंत्र A – श्लोक. ७–१०.

अनुक्रमणिका

आहे तोच गुरुपरंपरेने ज्ञानदेवांकडे आला असे दिसते. सरहपादांच्या दोह्यात वा मत्स्येन्द्रांच्या कौलागमात किंवा मीननाथांच्या अकूलवीर तंत्रात देवतांना अंतर्यामाचा वा चित्ताचा आश्रय आहे; तसेच ज्ञानदेवांचा 'बापरखुमादेविवर' हा ज्ञानदेवांचे 'अंतर्यामांत ज्योतिर्लिंग आहे.'

'अगाधपणे माझे अंगी बांधले। वरपडे देखिले मृत्तिकालिंग ॥
माझ्या शरीरी ज्योतिर्लिंग उगवले। अगाध कवळिले हस्तेवीण ॥
बापरखुमादेविवरु ज्योतिर्लिंग विश्वनाथ। (अभंग ३५५).

–विश्वनाथ हाच वज्रयानी लोकेश्वर असावा असे वाटते.

ज्ञानदेव विचारतात, परतत्व आहे कोठे ?

'बाई कोणे घरी सांगे वो जिवित्व। परेचे परतत्व कोणे घरी। सखि सांगे गोष्टी बाईये रुप वो घरी। आपणचि घरी सापडेल.' हे त्यांना उत्तर मिळते (३९०). अन्यत्र पुन्हा ज्ञानदेव म्हणतात 'तनुमनुधन पूज्य पैं केले। आत्मलिंग पूजिले बाईये वो॥ (५६५) हृदयपरिवारी कृष्ण मनोमंदिरी। आमुच्या माजघरीं कृष्णबिंबे॥ (५६६). ज्ञानदेव म्हणे निर्गुण निरंजन। मनाचे मोहन मूर्तिमाजी (७२३). विठ्ठल हा तर 'माझिये हृदयाची बुंथी' आहे असे सांगून ज्ञानदेव म्हणतात (१०९८) आमुची हृदयीची श्रीमूर्ति। घेउनि विठ्ठल वेषाची बुंथी। आता चाळविसी किती। बापा पालटू नेघे। (अभंग २८) अशा या विठ्ठलाचे ध्यान धरावे वा पूजेला जावे तर 'पाया पडू गेले तर पाउलचि न दिसे। उभाचि स्वयंभु असे। समोर की पाठमोरा न कळे। ठकचि पडिले कैसे ॥ ४ ॥ बोलावे तर परेहि परते बोलणे खुंटले। वैखरी कैसेनी सांगे ॥ ३ ॥ बाप रखुमादेविवरु हृदयीचा जाणुनी। अनुभवु सौरसु केला ॥'

अर्थातच विठ्ठलमूर्ती हृदयस्थ मंदिरात विराजित असल्यानंतर 'ती निरशून्य निरुपम निर्वाण। ते दशा पाषाण केवी पावती ॥ पाहता या डोळा न दिसे काही केल्या। व्यापूनिया ठेला बाहिजु भीतरी। तो पदपिंडा अतीतु भावाभावरहितु। बाप रखुमादेविवरु विठ्ठलु हृदया आतु ॥' (अभंग २४) अशीही ज्ञानदेवांनी समज दिलेली आहे:

निर्जिवा दगडाची काय करिशी सेवा।
तो तुज निर्देवा देईल काय ॥ १ ॥
कवण गुणे भुली पडली गव्हारा।
तीर्थाच्या माहेरा नोळखिशी ॥ २ ॥

अनुक्रमणिका

अष्टोत्तरशे तीर्थे जयाच्या चरणी ।
तो तुझ्या हृदयभुवनी आत्मारामु ॥ ३ ॥ ( अभंग ९०३ )

दुसऱ्या अभंगात ज्ञानदेव म्हणतात –

तीर्थे तू पाहसी कायी। तुजपाशी आहे ते कुठेच नाही ।। ( देहातच तीर्थे पाहा. असा अर्थ आहे. डॉ. प्र. न. जोशी म्हणतात 'अनेक तीर्थाच्या फंदात तू कशाला पडतोस हा अर्थ चूक आहे हे ओघाने येईलच )

दगडाचिया देवा घेता डोई। कपाळ फुटेल परी मोक्ष नाही ॥
झळझळित धोतरे देवतार्चनाचा पसारा
दिवसाची सोवळी दहा बारा ।। ( अभंग ९८७ ).

– मूर्तिपूजेविषयी ज्ञानदेव जसे अनुकूल नाहीत तसेच तीर्थाटनादि साधासां-विषयी त्यांना आदर नाही.

तीर्थ व्रत तप दान। जरी न करे हें मना। तरी सहजच साधन। गोपीनाथु ॥ ( अभंग २७ ) त्रिवेणी संगम नाना तीर्थे भ्रमी । चित्त नाही नामी तरी ते व्यर्थ ॥ ( अभंग ५७ ). या अभंगातील आशय मत्स्येंद्रांच्या कौलज्ञानातील आशयाशी फारच साम्य दर्शवितो. सरहपाद म्हणतात 'पासे पासभमन्ते अच्छह ॥' वास्तविक सारे जवळचा आहे. पण भ्रमन्ती सुरू आहे. देह हेच तीर्थ आहे. 'एथु से सरसइ, एथु से गंगासाअरु। वाराणसी पआग एथु। से चान्द दिवा अरु। ( दोहाकोश ९६ ) देह सरिस तित्थ। मइ सुणउ न दिठ्ठउ ॥९७॥ या देहातच सरस्वती गंगासागर, वाराणसी, प्रयाग आहेत देहापेक्षा वेगळे सरस तीर्थ असल्याचे मी पाहिले नाही ऐकले नाही. ज्ञानदेव म्हणतात 'काया काशी गुरु उपदेशी ॥' ( अभंग १२ ) गोरक्षसंहितेतील मत तसेच आहे 'न व्रतो न तीर्थञ्च.' ( कौलज्ञाननिर्णय प्रस्तावना डॉ. बागची. पान. ६९ ). कौलज्ञाननिर्णयात मत्स्येन्द्रनाथ म्हणतात –

'न काष्ठं मृण्मयं लिगं न शैलरत्नसम्भवम् । ( तृतीयपटल – १४ ) –अकूलवीरतंत्रात मीन नाथांचा आग्रह आहे 'न कुर्याद् क्षुद्रकर्माणि काष्ठपाषाण-पूजनम् ॥ ( ब. ६ ) कारण साधक एकदा अकूलवीर झाला की –

'न यज्ञं नोपवासञ्च न क्रिया वर्णभेदकम् ।
त्यक्त्वा विकल्पसंघातम् अकुलवीरलयं गताः ॥४३॥
न जपो नार्च्चनं स्नानं न होमं नैव साधनम् ।
अग्निप्रवेशनं नास्ति हेमन्त भृगु नोदनम् ॥४४॥

नियमोऽपि न तस्यास्ति नोपवासो विधीयते ।
पितृकार्यं न करोतीति तीर्थयात्राव्रतानि च ॥४५॥

(अकूलवीर तंत्र– अ)

कौलज्ञाननिर्णयात मत्स्येन्द्र म्हणतात की 'मानसपुष्पांनी पूजा कर.' (अर्चयेन्मानसैः पुष्पैः) अहिंसा प्रथमं पुष्पं द्वितीयेंद्रिय निग्रहम् ॥३-२५॥ असे सांगून 'सिद्धलिङ्गमिदं देवि देहस्थं प्रत्ययान्वितम् । मनोलिङ्गं सदा ध्यायेद् यां यां फलसमीहते ॥२८॥ 'तां लभन्ते न सन्देहो आत्मसम्वित्ति पूर्व्वकम् । एतत्ते कौलिकन्देवि देहलिङ्गस्य लक्षणम् ॥२९॥ (तृतीय पटल). असा मानसलिंगाचे पूजनाचा उपदेश करतात. ज्ञानकारिकेत देखील 'एतद्कौलिकं यल्लिङ्ग न शैलहेमरौप्यजम् ॥८॥' कथितं देहजं लिङ्गं एकन्तु न द्वितीयकम् ॥ (९॥) असेच सांगितलेले आहे. कौलज्ञाननिर्णयाच्या आठव्या पटलात देहांतर्गत पीठ आणि त्याच्या देवता व मंत्र ह्यांचे वर्णन दिलेले आहे. ज्ञानदेवांचे तीर्थाट-नादि सायासाविषयीचे व मूर्तिपूजेविषयीचे विचार सहजयानाशी पूर्णपणे सुसंगत आहेत. मत्स्येन्द्रनाथ 'मानस पुष्पे' आणावयास सांगतात ज्ञानदेव म्हणतात '.मन सुमन घालुनि माळा । (अभंग ४८८).

'नाद आणि बिन्दु'

सहजयानात नाद बिंदू तत्वांची चर्चा केली जाते. सरहपाद म्हणतात परमसुखावस्थेत चारशून्यातीत अशा अवस्थेत नाद आणि बिन्दु इत्यादि विकल्पापासून मुक्तता असते.

'नाद न बिन्दु न रवि शशि मंडळ
चिअराअ सहावे मुकल. (चर्या ३२)

– सरहपादांची नादशून्यातीत अवस्था कङ्कणपादाच्या चर्येतून अधिक स्पष्ट होते कारण कङ्कणपाद म्हणतात :

सुने सुन मिलिआ जबे
सअल धाम उइआ तबे.

– ज्यावेळी शून्यात शून्य मिळते (महाशून्यातीत अवस्था होते) त्यावेळी सर्व धर्माचा अस्त होतो 'बिन्दु णाद ण हिएँ पइठा.' बिन्दु आणि नादाला स्थान नसते. (चर्या ४४)

कौलज्ञाननिर्णयात नाद बिंदूची चर्चा नाही तरीपण गोरखनाथांनी मात्र अमरौघप्रबोधात नादबिंदूची चर्चा केलेली आहे आणि ही चर्चा वज्रयानी व

सहजयानी मताच्या पार्श्वभूमीवर आहे. गोरखनाथ आणि मत्स्येन्द्रनाथ यांचे ग्रंथ कालांतराने शैवागमाच्या पीठावर दत्तक देण्यात आले आणि मत्स्येंद्राला चोरून शंकराचा उपदेश करविला गेला. बौद्धांना शैवागमात समावून घेण्याचा प्रयत्न अकराव्या बाराव्या शतकापासून सुरू झाला होता.

अमरौघप्रबोधात गोरखनाथांनी आदिनाथ, मीननाथ आणि चौरंगीनाथांना नमन करून सिद्धबुद्धांना वंदना दिलेली आहे. त्याचप्रमाणे —

'चित्तो समत्वमापन्ने वायौ व्रजति मध्यमे

एषाऽमरोली वज्रोलीतदामति मतेति च ( सहजोली प्रजायते ) वज्रोली, सहजोली ह्या अभिधानाने अमरौघप्रबोध वज्रयान तंत्रयानाच्या छायेखाली निर्माण झालेले प्रकरण आहे असे दिसते. ( अमरौघप्रबोध ९ ). अमरौघप्रबोधात अतिशून्य आणि महाशून्याचाही निर्देश आला आहे. आणि ह्या महाशून्या-नंतरच्या श्लोकात—

'चित्तानन्दं ततो जित्वा सहजानन्दसंभवः,
दोष मृत्यु जरा दुःख क्षुधा निद्राविवर्जितः' ( ५१ )

—सहजानंदाची स्थिती वर्णन करून सांगितली आहे.

अशी अवस्था प्राप्त झाली की —

'न नादो न विन्दुश्च न चेतो नाप्यचेतनः ॥ ५४ ॥

—असे वर्णन गोरखनाथांनी दिलेले आहे आणि ह्याच अभिव्यक्तांच्या मार्गावर ज्ञानदेवांची महाशून्यावस्थेतील अभिव्यक्ती सहजयानीच ठरते. कारण ज्ञानदेव म्हणतात 'नाद ना बिंदु कळा न जोति। निवृत्तीने वृत्ति पालटली रया ॥ ( अभंग ७०९ ). तेथे ना ना बिंदु कळा ना छंदु। अक्षय परमानंदु सदोदितु ( अभंग २४ ) पण ही अवस्था तीन शून्याचे पलिकडे असते असेही ज्ञानदेव म्हणतात. 'तिही शून्यावरी नांदताहे देही। तोचि ब्रह्मांड गेही भरूनि ठेला ॥ ( ६५७ ) पण कधी कधी ज्ञानदेवांनी चार शून्याचा भेद सांगितलेला असतो. चहू शून्याचा भेद कैसा पाहावा देही। ब्रह्मरंध्री निःसंदेही निजवस्तू ॥ ( अभंग ७३५ ) 'शून्य हे चार महाशून्य दिसतसे। निरंजन वसे जग त्यांत' ( अभंग ७५६ ) ज्ञानदेवांची चार शून्याची कल्पना सहजयानी कल्पना आहे आणि सहजयानी साधकानी ही कल्पना नागार्जनाच्या शून्यवादातून उचलून घतली आहे.

अनुक्रमणिका

नागार्जुनाच्या पंचकर्म नामक ग्रंथात शून्याचे चार स्तर सांगितले आहेत:

'शून्यं च अति शून्यं च महाशून्यं तृतीयकम्।
चतुर्थम् महाशून्यं च'[१]

डॉ. एस. बी. दासगुप्ता म्हणतात: 'The reality is free from both existence and non existence ...... it is beyond the comprehension of even all Buddhas who are endowed with the knowledge of void nature.[२] गुह्यसिद्धीच्या या वचनानुसारच ज्ञानदेव कधीकधी –

'चहुशून्याअरुते महाशून्यापरुते।
सर्वांसी पहाते तेंचि गा। (अभंग ७४२)

अशीही अवस्था वर्णन करतात:

नादबिंदुविषयी ज्ञानदेव म्हणतात
'नादबिंदा कल्होळ गर्भी झाला।' (अभंग ७१०)
'आता बोलाबोली नको बा आणिक।
बिंदु ती निःशंक ब्रह्म रया ॥७६५॥

सहजयानात बिंदु अहं स्वरूपी आणि नाद इदं स्वरूपी असतो. अमरौघप्रबोधात गोरक्षनाथ म्हणतात –

'बिन्दुनादौ महौषध्यौ विद्येते स जन्तुषु' (१३) चारशून्य, नाद बिंदु ही सहजयानी प्रतीके ज्ञानदेवांनी आपल्या अभंगात सरहपाद, कंकनपाद, गोरखनाथ यांच्या सहजयानी अर्थाप्रमाणेच वापरली आहेत हे लक्षात घेता ज्ञानदेवांचा सहजयानी मार्ग स्पष्ट होण्यासारखा आहे.

ज्ञानदेवांची विठ्ठल मूर्ती ही विज्ञानमूर्ती आहे आणि ज्ञानदेव हेदेखील विज्ञानवादी पंथाच्या छायेखाली वाढले आहेत अशी ग्वाही देणारा एक अभंग त्यांच्या अभंगगाथेत अंतर्भूत आहे. (अभंग ५३२).

सतता वसोनी मायेसी पर। विज्ञान हे घर जीवी दिसे ॥ १ ॥
ज्ञानी वसे विज्ञानी न दिसे। बिंबि बिंब रसे समता शांती ॥२॥
आपी आप रस जनवन दारा। विज्ञान उभारा भावी दिसे ॥३॥
बापरखुमादेविवरू उभारण हरि। दिपु माजिघरी ठेवियेला ॥४॥

---

१. तांत्रिक बुद्धिझम् एस. बी. दासगुप्तांच्या पुस्तकातून उद्धृत.
२. पूर्वोक्त. पान. ४१

मायेपासून पर असणाऱ्या या (आलय) विज्ञानाचा ठाव घरीच (देहातच) आहे. ज्ञानामुळे जगाचा पसारा भासमान होतो. पण विज्ञानाने मात्र त्याचा लोप होतो आणि बिंबात बिंब लोपून सारे शांत होते. समत्व निर्माण होते. पाण्यात पाणी जसे मिळून असावे तसेच पुत्रपौत्रादि आहेत. पण विज्ञानाचा हा उभारा संसारात व्यक्त होतो. मी ह्या विज्ञानाचे ठायी विठ्ठलाची स्थापना करून अंतरातील ज्योत प्रज्वलित केली आहे.' ज्ञानदेवांचा योगाचार पंथ हा सेश्वर पंथ हे मागे सांगितले आहेच.

'ज्ञानचि विज्ञान आले हाता। आम्हा नाही शरिरी ममता ॥' असेही ज्ञानदेव म्हणतात (अभंग ५७१).

## ज्ञानदेवांचे सहजयानी विचार

ज्ञानदेवांच्या अभंगात सहजयानी विचार इतस्ततः विखुरलेले आहेत. 'न गणवे परिमाणे न बोलवे अनुमाने। तो सहज निर्वाणी ज्ञाने फळला वो माय ॥ (अभंग ५१४) असे ज्ञानदेव सांगतात. 'नव्हे व्यभिचारिणी नाही मज कोणी। पाहता निर्वाणी सहज जोडले वो माय' ॥ (अभंग ५१७) असेही ते म्हणतात. मी व्यभिचारिणी नव्हे. कारण पाहता पाहता मी निर्वाणरूपी 'सहजपद' प्राप्त करून घेतले. किंवा जो परमेश्वर परिमाणाने मापला जाऊ शकत नाही, जो अनुमानाने सांगता येत नाही तो सहजस्वरुपात निर्वाणपदी प्राप्त झाला असे ज्ञानदेव स्पष्ट करतात. ईश्वराशी कलह करून त्याला नाना प्रकारची दूषणे देऊन शेवटी म्हणतात 'समस्त जीव हे तो तुझे आकारले येरी ते लटकीच भ्रांती। जागसी ते करी देवा तेचि ते सांगो किती ॥ दग्धबीजी तरुबीजी सामावला तैसा तुजमाजी श्री गुरु निवृत्ति। ऐक्य झाले तेथे नित्य दिवाळी। सहज समाधी तेथे कायसी रे टाळी ॥ (३९१)

इंद्रियाचे लळे पुरवायचे नाहीत. पण इंद्रियाला शिणून मारावयाचे नाही. असाही त्यांचा पंथ आहे. तोही सहजयानी विचार आहे.

'शरीर वरि वरि कां दंडिसी। जव वारिले न करि तुझे मन ॥

– असा प्रश्न करून ज्ञानदेव म्हणतात बगळ्यासारखे ध्यान करू नकोस चित्ताचे, मनाचे सुमन कर. वनात राहतोस आणि वनितेचा ध्यास करतोस? काय सांगावे.

त्रिकाळ स्नान करिसी तीर्थ जळी।
परि नव जाती मनीचे मळ
तुझियानी दोषे तीर्थे कुश्चित झाली. (अभंग ८५२)

गोरखनाथांचा देखील विचार असाच आहे :

'तीरथि तीरथि सनाम करिला। बाहर धोये कैसे भीतरि ' भेदिला ॥

–घरादाराचा त्याग करतो म्हणशील तर तुझ्या जवळचे जाडे शरीर कसे त्यागशील ? मायबाप त्यागतो म्हणशील तर अहंकार अविद्येचे कोडे आहेच. बंधु आणि सखे सोडून जाशील तर काम-क्रोधांनी तर अवघडून ठेवले आहे. बहिणीचा त्याग करशील तर आशा तृष्णा पाठिशी आहेतच. मग ह्यांचा त्याग करण्यापेक्षा सहजानंदी संतोषातच राहा, असे ज्ञानदेव सांगतात ( अभंग ८५७).

गोरखनाथ त्यांचे पूर्वी तेच सांगतात :

माया मारिली मावसी त्यजिली तजिला कुटुंब बंधू –
संहसार कवल तहाँ गोरष बाला जहाँ मन मनसा सुर संघू .
आसा तजीला, तृसना तजिला तजीला मनसा भाई
नौ षंड पृथ्वी फेरि मै घालो गोरष रहिला सच्छिद्र ठाई.

( गोरखबानी पृ. १४१ )

– अन्यत्र ज्ञानेश म्हणतात – ' षट्शास्त्रे आणि वेद त्रिविध मुक्तीविषयी वल्गना करतात. नानाप्रकारची मते उच्छृंखलासारखी बरळत राहतात. पण त्या मार्गाने, त्यांच्या आहारी जायचे नाही. यम नियम प्राणायाम प्रत्याहार यांनी व्यर्थ श्रमू नकोस. ( ८५० ) पूजा समाधि यज्ञयागादि कर्मे जपतप अनुष्ठाने, मंत्रयंत्रादि मार्ग धुंडाळशील पण ब्रह्मजिज्ञासेचे वचन त्यात नसणारच. ' अहं ब्रह्मासि ' हे सुद्धा केवढे अहंकारी लेणे घेतलेस तू ! ( ८४९ ) मतमतांतराच्या ग्रंथाच्या रचनेत आणि ज्ञानव्युत्पत्तीच्या खटपटीत आत्म-प्रचिती झाली नाही तुला. कारण अंतरात विखार भरलेस आशापाशाचे आणि उपासनेने मुक्त होऊ पाहाशील तर भलताच खेळ खेळू नकोस. दमशील. कारण ते गंधर्वांच्या नगरीत खेळण्यासारखे होईल. त्यापेक्षा बापरखुमादेविवराला हृदयात साठवून घे. (८५३) असे आर्जवून सांगताना ज्ञानदेवांनी मीमांसकांनाही समज दिलेली आहे –

' सोमयाग श्रेष्ठ करिता पावन ।
करावे हनन पशु तेथे ॥
तेचि ते या दोष तयालागी जन्म ।
भोगिजेति कर्म पशु योनी ॥
पापपुण्य दोन्ही त्यागुनि निराळा ।
जाहला स्व लीळा ज्ञानदेव ॥ ( ६११. )

– प्राप्तीचा संतोष आणि हानीचे दुःख असे संकल्पविकल्प देहात आहेत तोपर्यंत कशाला मुंडन करतोस ? ते बहुरूप्यासारखे नटणे होईल. प्रथम वासनांचे मुंडन करायचे आहे. भिक्षु होऊन कोणी निर्दोष झालेत काय ? मग सणाचे दिवशी रजकही भिक्षा मागतात. देव देव करून फुगशील पण शेवटी मूर्खा वाया जाशील. अंगाला भस्म लेपन करशील तर गाढव उकिरड्यावर लोळते त्याला काय अध्यात्माची चाड असते. तीर्थ व्रत जप स्नान हे सारे व्यर्थ आहे तुझे ध्यान देखील. ह्या कर्मांनी तुझा मार्ग चुकला आहे (अभंग ८५९)

सरहपादांनी देखील असेच म्हटले होते. 'सहजच्छाडि णिव्वाणेहि धा विउ।' ( सहजनिर्वाणाकडेच धाव घे ).

'किन्तह दीपे किन्तह णेवेज्जे। किन्तह किज्जई मन्तह।
किन्तहि तित्थ तपोवण जाइ। मोक्ख कि लब्भइ पाणी न्हाइ।
सरह भणइ जग वाहिअ आले। णिअ सहाव ण लक्खिअ वाले॥'

– स्वभावाचा विसर पडला ह्या बालकाला असे सरहपाद म्हणतात. 'मन्त ण तन्त ण धेअ ण धारण। सव्ववि रे बढ विब्भम कारण.'॥ (४३) किती दीप लावलेस, नैवेद्य दाखविलेस. किती मंत्र, किती तंत्र, कितीतरी तीर्थे आणि तपोवने, पाण्यात स्नान करून काय मोक्ष मिळतो ?

ज्ञानदेव म्हणतात 'तुला तुझी ओळख झाली नाही तोपर्यंत तप तीर्थ व्रते यांच्या गर्जना चालू आहेत तुझ्या माथ्यावर. पण जेथे वेद ही मौन होऊन राहातात त्याचा उपभोग घे. कशाला हव्यास धरतोस ? हा सगळा भ्रम आहे. मृगजळ पाहून हरिणे धावत आलीत आणि शेवटी पाणी समजून मेली. पुत्र कलत्र हे सारेच तसे मिथ्या होत.' ( १७४ )

संसाराचे मिथ्यात्व मान्य असूनही ज्ञानदेवांना इंद्रियांची कर्मे मान्य आहेत. कारण मुक्तीसाठी देह हेच साधन आहे. पण अवडंबरांचा आश्रय, मीमांसकांची व्रते आणि उद्यापने. वेदप्रामाण्य यावर त्यांचा विश्वास नसून त्यांना चित्ताचे ठायी विज्ञानाचा दीप लावायचा असतो.

तीर्थव्रत दान यागादिक साधन अनुभव राहाणीवीण।' यासर्वांचा धिक्कार करून ज्ञानदेव म्हणतात विठ्ठलाशी एकान्त करशील तर द्वैताद्वैतातीत होशील. ( १२९ ). राखुंडी फुंकून कोणता दीप पाजळणार आहेस ? तसेच तुझ्या शब्दाच्या काथ्याकुटाने झाले आहे. तुला ज्ञान प्राप्त झालेले नाही. दंभाच्या खटपटीत थकून गेलास, मृगजळाची नदी बघून धावत गेलास, पण तृषिता तुला

भंगा नाहीच मिळाली.' दृष्टीला अज्ञानाचे पडळ आले. विषयाच्या ग्रंथीत गुंतून पडलो त्याने आत विव्हळ झालो. दृष्टीला अंधपण आले पण अवचित निवृत्ती गुरु भेटले. आता निवृत्तीचा धर्म जागू दे. त्याने पडळ दूर सारले.

'ज्ञानाचा निजबोधु
विज्ञान रूप सकळ।' (१०१२) पुढे ज्ञानेश म्हणतात 'देव देव करून व्यर्थ कशाला फिरतोस ? जप तप तीर्थे ही सारी साधने खोटी आहेत कारण या साधनांनी संसाराच्या गाठी सुटत नाहीत.' (८३५).

सरहपाद म्हणतात –

'वेय पुढिज्जअ लक्खवि दिज्जअ।
तहवि ण तुट्टइ एहुं संसारु।' (दोहा ७२)

आणि गोरखनाथ देखील तसाच प्रस्ताव मांडतात.

'कैसे बोलो पंडिता देव कोने ठाइ। निजतत निहारता अम्हे तुम्हे नाइ।
पाषाणाची देवली पाषाणाचा देव। पाषाण पूजिला कैसा फिटिला सनेह ॥१॥
सरजीव तोडिला निरजिव पूजिला पापचि करणी कैसे दूतर तिरिला.'
(गोरखबानी पान. १३१–१३२)

ज्ञानदेवांचा हा पक्ष लक्षात घेता तो सरहपाद, मत्स्येन्द्र आणि गोरक्षनाथ ह्यांनी वेळोवेळी मांडलेला सहजपक्ष आहे हे सिद्ध होते. अर्थातच हे सहजयान वज्रयानाच्या वाटेने विज्ञानात जाते. शंकराचार्यांनी विज्ञानवादाचा जो अधिक्षेप केला त्याचा विचार करता ज्ञानदेव शांकरवेदान्तापासून दूरच नव्हे तर विरोधात उभे आहेत असे त्यांच्या अभंगाच्या धाटणीवरून दिसते; अन्यथा शंकराचार्य सहजयानी होते असे म्हणावे लागेल.

मूर्तिपूजेवर अश्रद्धा, वेदांची उपेक्षा, यज्ञयागादी क्रियांचा उपहास, तीर्थे, व्रते, रमणे याविरोधी नेहमीच व्यक्त होणारी ज्ञानदेवांची मते ह्यामुळे तत्कालीन ब्राह्मण समाजात ज्ञानदेव अप्रिय होते ह्यात आश्चर्य वाटत नाही. म्हणुनच ज्ञानदेवांचे जीवन सहजयानी साधकाचे जीवन म्हणून मान्य करावे लागते; व ते जीवन विठ्ठलपंताचे होते असे मागे दिलेल्या अभंगावरून आणि निळोबांच्या गाथेवरून स्पष्ट होते.

ज्ञानदेवांचा पक्ष सहजयानी पक्ष होता असे एकदा लक्षात घेतले आणि तीर्थाटणादी सायासांवर त्यांचा विश्वास नाही अशी साक्ष त्यांनी अभंगातून वेळोवेळी दिली असल्यामुळे नामदेवांच्या अभंगातील 'तीर्थावळीचे प्रकरण' अनायासेच कीर्तनी कल्पना म्हणून निकालात निघते.

अनुक्रमणिका

बहुजनसमाजाला आकलन व्हावे ह्यासाठी सिद्धांनी आपले तत्वज्ञान अपभ्रंशातून मांडले तसे ज्ञानदेवांनीही ते अपभ्रंश प्राकृतात मांडले. ज्ञानदेवांचा सहजयानी पंथ लक्षात घेता गीताभाष्य रचण्याचे आधीच त्यांची सहजयानी अभंगी रचना सौकार झालेली होती. आणि सहजानंदाचे, निरंजनाचे ठायी वा परमपदी शून्याचे ठायी त्यांनी विठ्ठलाची स्थापना केली होती हे जर लक्षात घेतले तर ज्ञानदेवांच्या वाङ्मयनिर्मितीत अभंगाचा क्रमांक प्रथम ठेवावा लागतो, डॉ. पेंडसे म्हणतात 'ज्ञानदेवांनी अभंगरचना उत्तर-आयुष्यात केली असावी* ... नामदेवांच्या संगतीत असतानाच ज्ञानेशांनी बहुतेक अभंग रचिले असण्याचा संभव आहे,' नामदेव ज्ञानदेवांची भेट झालीच नाही ह्याचा विचक्षण दृष्टीने डॉ. पेंडसे ह्यांनी शोध घेणे आवश्यक होते. पण श्रद्धेच्या पाटावर बसून झालेले पोटभरू संशोधन खरे नसते. डॉ. पेंडसे म्हणतात पहिल्या तीन ग्रंथात विठ्ठलाचे आणि पंढरपुराचे नांवही आढळू नये आणि अभंगात ते आढळावे. डॉ. साहेबांनी ज्ञानदेवांचे अकराशे अभंग नुसते डोळ्याखालून घातले असते तर केवळ तीनचार ठिकाणीच पंढरपूर आणि विठ्ठल ह्यांचा संबंध आलेला आहे हे जाणवले असते. पण ते अभंग ज्ञानदेवांचेच असावे असेही म्हणता येणार नाही. ज्ञानदेवाचा 'बापरखुमादेविवरु विठ्ठलु' ही चैतन्य स्वरुपी चित्ताचे ठायी असणारी प्रज्ञा आणि बोधीसत्वाची, अर्धनारीनटेश्वराची शून्यमूर्ती होती आणि तिचा व पंढरीच्या पांडुरंगाचा मुळात संबंध नसावा असेही म्हणता येते. प्रज्ञा आणि उपायाच्या मीलनाचे सेश्वर सहजयानी तत्व-ज्ञानच अमृतानुभवातही रंगविलेले आहे. ज्ञानदेवाच्या गीताभाष्यातील ओवी घोटीव आहे असे जर लक्षात घेतले तर ज्ञानदेवांच्या अनेक अभंगात त्यांना वृत्त गवसले नाही असेही दिसते आणि ज्ञानदेवांची कित्येक काव्ये ही वृत्तहीन, छंदोहीन गद्यकाव्ये दिसतात. त्यातून ज्ञानदेवांच्या अभंगरचनेची उत्क्रांती शोधता येणेही शक्य होते. पण तो स्वतंत्र लेखाचा विषय आहे आणि त्याचे दिग्दर्शन करूच. डॉ. पेंडसे ह्यांनी आपले मत पुन्हा तपासून पाहण्याची आवश्यकता आहे असे मात्र सुचवावेसे वाटते.

ज्ञानदेवीच्या तत्वज्ञानात शैवागमाचा प्रभाव दिसतो हे मत बाळाचार्य खुपेरकरशास्त्रीच्या भाषणमालिकांचा वृत्तांत वाचल्यानंतर नाकारता येत नाही. गीताभाष्यातून सहजयानी विचाराचे अवशेष भरपूर सापडतात. लेखाच्या विस्तारभयाने ते येथे वेचण्याचे टाळले आहे. आणि केवळ अभंगाचाच विचार

* श्री ज्ञानेश्वराचे तत्वज्ञान. डॉ. शं. दा. पेंडसे. पान ३७५.

केला आहे. पण शैवागमाची छाया ज्ञानदेवीवर आहे ह्याची कारणमीमांसा देणे आवश्यक आहे. ज्ञानदेवीत आणि अभंगात ज्ञानदेव कधी कधी स्वतःशीच विसंगत ठरतात त्याचे कारण क्रांतिकारकांच्या भूमिकेतून उत्क्रांत होत होत जीवनाच्या उत्तरार्धात थकलेल्या मनाने त्यांनी मीमांसकांशी तडजोड करण्या-साठी शैवागम स्वीकारला असावा. म्हणुनच वाळीत टाकलेले ज्ञानदेव अनिच्छेने स्वीकृत झाले आहेत. ज्ञानदेव हे वेदान्ती नसून सिद्धान्ती होते आणि तेच विठ्ठलपंत होते हे लक्षात घेता ज्ञानदेवांच्या जीवनाचा इतिहास सहजयानी मार्गाने अधिक स्पष्ट होतो.

सिद्धार्थ, सरहपा आणि ज्ञानदेव ही तीन व्यक्तिमत्त्वे थोर होती. संस्कृतच्या विरोधात पहिली क्रांती गौतमबुद्धाने केली होती. त्याने धर्मतत्त्वे जनसामान्याला कळतील अशा सुलभ शब्दात पाली भाषेचा आश्रय घेऊन मांडली आहेत. अशोकानेही तीच परंपरा राजाश्रयी बनविली.

महायानांनी सुलभ संस्कृतात रचना केल्या आणि तांत्रिकांनी तर व्याकरणाचे बंधन झुगारून संस्कृतला प्राकृत वळणाची बनविली हे कार्यदेखील बौद्धांचेच.

सरहपादाने अपभ्रंशभाषेत धर्म सांगून मावळत्या बौद्धधर्माला सहज-यानाच्या वाटेने पुन्हा एकदा उदयाला आणले ते सहजयान कबीराच्या काळा-पर्यंत संतांना प्रकाश देत राहिले. सरहपाद हाच आदिनाथ असावा. शंकराला आदिनाथ म्हणण्यात फार मोठी चूक होत असते. नाथ संप्रदायाचा उद्गम सरहपादांपासूनच शोधावा लागतो. कारण नाथांच्या आणि सिद्धांच्या परंपरेत सरहपादांचे नाव सर्वप्रथम असते. सरहपादांची परंपरा नाथ परंपरा असावी हे त्यांच्या दोह्यातून स्पष्ट होण्यासारखे आहे. कारण शून्याची अथवा परम-पदाची कल्पना स्पष्ट करीत असता सरहपाद म्हणतात '.अच्छहु सिरिगुरुणा हे कहिज्जइ' (दोहा कोश. ५९ ते ६२) ही कल्पना श्री गुरुनाथांनी मला सांगि-तलेली आहे. पण सरहपादांनी आपल्या गुरुनाथांचे नाव सांगितले नाही त्याअर्थी बुद्धाला ते गुरुनाथ म्हणत असावेत. तात्पर्य नाथांचा आदिनाथ हा शंकर नसून बोधीतत्वाला अथवा विज्ञानातील अक्षोभ्य बुद्धाला दिलेले ते नाव असावे. सरहपादांच्या काळात किंवा मत्स्येन्द्र, मीननाथाच्या काळात तरी नाथ पंथ हा सहजीया पंथ असून त्यांचे शैवागमाशी कोणतेही नाते नव्हते. मत्स्येंद्रनाथांना कालांतराने शैवागमात आणले गेले. जे जे बौद्ध होते ते ते शैव झाले. बौद्धस्तूपावर शैव मंदिरे बांधण्यात आली. पौनीचे शिव मंदीर

अनुक्रमणिका

हा त्याचा बोलका पुरावा आहेच पण चिंतापिल्लीच्या राजाने अमरेश्वराचे शैव मंदिर बांधण्यासाठी अमरावतीच्या भव्य स्तूपाचे दगड काढून नेले त्याचा मेकंझीने दिलेला इतिहासही बोलका आहे.[१] पुंडलिकांच्या पादुकांवर शंकराचा मुखवटा ठेवण्यात आला. विठ्ठलाच्या शून्यमूर्तीच्या डोक्यावर शिवाला ठेवण्यात आले. अक्षोभ्य बुद्धाला नीळकंठ शंकराचे रुप देण्यात नवी पुराणे बांधण्यात आली. बौद्धाची तारा स्मार्तांची भद्रकाली झाली. वास्तविक काली हीच काडी या नावाने बौद्धांची वा वज्रयानाची आदि देवता असून अक्षोभ्य बुद्ध हा आदिनाथ होता पण त्याचे रूपांतर पुढे काली आणि शंकर ह्यांचे कथेत सांगण्यात आले. शल्यकार्य झालेल्या पुराण कल्पनांमागे दडलेला बौद्धांचा पिंड तपासून न पाहताच संतसाहित्यावर संशोधन करणाऱ्या महाभागांनी शैवांचे गोडवे गाण्यासाठी आदिनाथ म्हणजे शंकरच असा दावा मांडला आणि त्याच चुकीने कै. दांडेकरांनी महेश हा आदिनाथ म्हणजेच शिव होता असे प्रमेय मांडून श्रद्धामूलक घोटाळा करून ठेवला. पण आदिनाथ आणि शंकर यांचे नाथांशी साम्य नसून नाथोत्तर काळात त्यांना शैवागमाचे पांघरुण देण्यात आले हा इतिहास लक्षात घेता 'महेश' हे शंकराचे नाव नसून ज्ञानदेवांचे उपनाम होते असेच ठरते. अर्थातच 'महेशान्वय संभूते' याचा अर्थ महिशे वा म्हसे कुळात ज्यांचा जन्म झाला आहे असाच होतो. ज्ञानदेव महिशे आडनावाचे गृहस्थ होते व त्यांनीच वेदपठण करून ब्राह्मणांचा रोष शांत केला ती घटना ज्ञानदेव काळानंतर श्रद्धावान कालखंडाचे स्मरणात नामदेवांच्या अंतरात म्हैशाने वेद म्हटले असे चमत्कारिक कथेच्या स्वरूपात कायम झाले. महिश या नावातील 'महा' हे विशेषण देखील बौद्धविशेषण आहे. महाब्रह्मा, महाशून्य, महाबोधी, महाअर्हत, या आध्यात्मिक संज्ञातील महा हे बौद्धविशेषण समजावून घेतले तर त्याच प्रभावाखाली ज्ञानेशांचे कुळनाम महिशे होते वा महेशे होते* हे लक्षात येते. महायानी संस्कृतात व्याकरणाचे बंध नसतात त्यावरून संस्कृत भाषेच्या नियमाने महा + ईश या दोन शब्दांचा संधी करून व्याकरणाचे धडे देण्याचा प्रयत्न करू नये.

प्रस्थापित संस्कृत मूल्याचे विरोधी, वेदप्रामाण्य नाकारून श्रौतस्मार्त धर्माचे चौकटीचे बाहेर राहून या देशात बौद्धांनीच क्रांती केली. क्रांती

१. ट्री अॅण्ड सरपेंट वरशिप. जेम्स् फर्गसन. पान १५०
( इंडियन एडिशन. १९७१. )

* म्हसे यजुर्वेदी ब्राह्मणात उपनाम असते.

करणारे सरहपासारखे महाभाग जातीने ब्राह्मण होते. मत्स्येन्द्राची जातदेखील ब्राह्मणच होती. पण सहजयानात वा नाथपरंपरेत जात सुटते. मूळ नाव सुटते, चर्यानामे, गुप्तनामे, पूजानामे प्राप्त होत असतात. मत्स्येंद्रांची अशी अनेक नावे होती.[१] डॉ. पेठे संपादित 'ज्ञानेश्वर वाग्यज्ञ' हा ग्रंथ नजरेखालून घातला असता ज्ञानेश्वर वा ज्ञानदेव हे नामाभिधान ब्राह्मणात नसते. किंवा यादव-काळातील नावात ते आढळत नाही हा मुद्दा लक्षात आला. ज्ञानेश्वर वा ज्ञानदेव विज्ञानवादी सहजीया संत होते हा जर विचार चांदोरकरांनी लक्षात घेतला असता तर ज्ञानदेव हे नावदेखील शांतिदेवासारखेच बौद्धनाम आहे हे त्यांना जाणवले असते. बौद्धागमातील चर्यानामे ब्राह्मणांत नसावीत यात नवल वाटण्याचे कारण नाही. संस्कृतच्या प्रस्थापित मूल्याचे विरोधात प्राकृताच्या निशाणाखाली धार्मिक क्रांती करणारा तिसरा महाभाग ज्ञानदेव होता.

ज्ञानदेवांच्या कथेतून ज्ञानदेवांच्या चरित्राचे कण वेचून त्यातून ज्ञानदेव—चरित्राचा सांगाडा तयार करण्यात येतो. विठ्ठलपंत नावाच्या कोणा महिशे उपनाम असणाऱ्या कर्नाटकी प्रदेशातील यजुर्वेदी ब्राह्मण घराण्यातील गृहस्थाने नृसिंहपाद वा श्रीपाद या सहजयानी साधकाच्या प्रभावाने प्रभावित होऊन भार्यात्याग करून सहजायानी तंत्रमार्गाचा अवलंब केला होता. त्याची पुसट-स्मृती निळोबाच्या कालखंडापर्यंत रेंगाळत होती. कारण या अभंगातून विठ्ठल-पंतांना जी दूषणे लावलेली आहेत ती सारी बौद्धतांत्रिकाचा उपहास करण्या-साठीच आहेत असे दिसते. वज्रयानी सहजपंथात सरहपादांच्या काळखंडापासून गृहत्याग आवश्यक नसला तरी परमपद प्राप्तीसाठी सांसारिक सुखाचा अडसर हा अभिप्रेत होताच. 'घरात भार्येसहित रममाण व्हाल तर विषयापासून सुटका नाही आणि मग ज्ञान कसे होणार' असे सरहपाद विचारतात (दोहा. १८). सहजयानात ब्रह्मचर्यदशेला 'पशुदशा' म्हणतात. 'चर्याचर्य-विनिश्चयात' कानुभट्टाने, परमपदप्राप्तीसाठी 'स्वभार्यात्याग' आवश्यक ठरविला असावा. याच मार्गाने विठ्ठलपंताचा सहजयानी विचार परिप्लुत झाला असावेसे वाटते. गौळणी-विरहिणीच्या अभंगातून देखील सहजयानी तांत्रिक कामुक अभिव्यक्ती विठ्ठलपंतांच्या ऊर्फ ज्ञानदेवाच्या तंत्रमार्गाची जाणीव करून देतात. या कामुक अभिव्यक्तीत केवळ अपवादानेच निवृत्तिनाथांचा आणि ज्ञानदेवांचा संबंध दिसतो. त्याअर्थी ही अवस्था निवृत्तींचा बोध होण्या-

---

१. नित्याह्निक तिलकम्. डॉ. प्रबोधचंद्र बागची. कौलज्ञाननिर्णयात—पान ७०.

पूर्वीची विठ्ठलपंत अथवा ज्ञानदेवांची अवस्था असावी असे ठरते. पण ब्राह्मणी संस्कारात वाढलेल्या विठ्ठलपंतांवर वेद संस्कार झाला असावा असे वाटते. भार्यात्यागानंतर विठ्ठलपंतांना पशुदशा प्राप्त झाली. सहजयानात प्रविष्ठ झाल्यामुळे उपनयन संस्कार लोपला. तंत्रमार्गाचा उबग आल्यामुळे निवृत्तीच्या कृपाप्रसादाने ज्ञानदेव गोरखनाथ संशोधित शुद्ध सहजयानी नाथ-भक्तीच्या पंथावर चालू लागले. अर्थातच आळंदी, नेवासे, पैठण येथे यादवांच्या राजाश्रयाखाली मीमांसकांचा प्रभाव वाढता असल्यामुळे बौद्धांना आणि महानुभवियांना जीवन जगण्यासाठी अनुकूल परिस्थिती नसावी. ज्ञानदेवांचे उत्तर आयुष्य मीमांसकाशी तडजोड करण्यात गेले. येथेच ज्ञानदेवांचा पराभव आहे. या तडजोडीतच गीताभाष्य अंतर्गत विसंगतीने पूर्ण भरलेले आहे. या पराभवाचे पोटीच वर्णप्रतिपादन, वर्णोच्छेद, वेदनिंदा, वेदप्रतिपादन या परस्पर विसंगत मूल्यांना ज्ञानदेवीत स्थान मिळाले आहे. या समायोजनाच्या प्रक्रियेतच विठ्ठल शून्यमूर्ती, कृष्णमूर्ती, गोपिकांचा प्रियकर म्हणून ज्ञानदेवांनी मान्य केला आहे. समाजाच्या चौकटीत बसण्यासाठी शैवतंत्रातील तत्वांचा स्वीकार केला आहे. पण हे समायोजन प्रस्थापित होण्याचे आधी मात्र विठ्ठलांना आलयानंदीच्या व प्रतिष्ठानच्या मीमांसक ब्राह्मणांसमोर आपली ब्राह्मणी श्रद्धा व्यक्त करावी लागली होती. आलयानंदीच्या ब्राह्मणांनी विठ्ठलपंताना श्रौतस्मार्त समाजरचनेत स्वीकृत करून घेण्याचे नाकारले असावे. व अस्पृश्य समजून त्यांना देहान्त प्रायश्चित्त दिले असावे.

पण पैठणच्या ब्राह्मणांनी मात्र त्यांचेविषयी सहानुभूतीची दृष्टी स्वीकारून त्यांना योग्य प्रायश्चित्त दिले असावे. तुकाविप्राच्या ज्ञानदेव चरित्रात विठ्ठलपंतांनी देहांत प्रायश्चित्त घेतलेले नमूद नाही. त्याअर्थी प्रायश्चित्ताविषयी 'ज्ञानदेवांची चरित्रसाधने' विश्वसनीय नाहीत असे म्हणावे लागते. पैठणच्या ब्राह्मणांनी प्रथम ज्ञानदेवांना निंदाव्यंजक शब्दात त्यांच्या दशेचे वर्णन करून त्यांना पशु व त्यांच्या नावाने म्हशा, व म्हैशा असे संबोधून वेद पठनाचा आदेश दिला. कदाचित संतापाच्या भरात ज्ञानदेवांना त्यांनी ताडण केले असावे. पशूने व म्हैशाने वेद म्हटले या चमत्कारातून ज्ञानदेव या पशुदशा भोगणाऱ्या 'म्हेशे' उपनाम असणाऱ्या गृहस्थाने वेद म्हटले असे म्हणता येते. असा ज्ञानदेवाचा इतिहास प्राप्त होतो.

अपभ्रंशातून मराठीच्या उगमाचा शोध पुष्पदंताच्या महापुराणाच्या आधाराने श्री. ग. वा. तगारे ह्यांनी वीस वर्षांपूर्वीच घेतला होता. सिद्धांच्या

चर्यंत वा दोहचात मराठीला जवळची असणारी रचना शोधता येते. आणि मराठीचा काळ कृष्णाचार्यपादाच्या काळात ठेवता येतो. कारण मराठीची रचना ह्या कालखंडात डोकावत असते.

भणे लुइ आम्हे साणे दिठा १). आंङगण घरपण २). दिवसई बहुडी काऊरे डरे भाअ ३). सासु घरे घाली ४). जे जे आइला ते ते गेला ७). सोने भरिता करुणा नावी ८). सारिअ सासु नणन्द घरे शाली ११). पहिले तोडिला १२). जो रथे चढिला १४). जे जे उजुवाटे गेला १५). बत्तीस १७). हाथरे मा काङगण लेऊ दापण २३). सरह भणे बापा उजुबाट भइला ३२). हाडीत भात नाही ३३). आहार कएला ३५). एकले जग नाशिअ रे ३९). भण कैसे सहज बोलवा जाअ ४४). कपासु फुटिला ५०).

✦ ✦ ✦

श्री. शं. वा. जोशी

# ‘हिंदू’ धर्माविषयी चार शब्द

## १) प्रस्ताव

न्यूयार्क येथे काही जिज्ञासूंनी विचारलेल्या प्रश्नांच्या संदर्भात व्यक्त झालेल्या काही विचारांचा सारांश, थोडी भर घालून येथेही चर्चेसाठी पुढे मांडीत आहे.

लांग ऐलंड ( न्यूयार्कचा भाग ) येथील एका चर्चने एक नवा उपक्रम प्रारंभिलेला पाहिला, आपल्याकडेही अशी प्रथा प्रारंभ होणे जरूर वाटते. रविवारच्या प्रातःकालीन प्रार्थनेनंतर, तेथे दुसऱ्या मजल्यावर, धार्मिक विषयावरील विशेष माहिती जाणू इच्छिणाऱ्यांचा एक ग्रूप, एका प्रशस्त खोलीत जमतो. तेथे, जगातील विविध धर्मपंथाची माहिती करून देण्याकरता, त्या त्या संप्रदायाच्या जाणकाराना आमंत्रण देण्याची प्रथा आहे असे कळले. या चर्चचे एक प्रमुख कार्यकर्ते डॉ. टाल्बर्ट यांचा काही कारणांतराने, परिचय झाला होता; यानी, मला आपल्या चर्चमधे, ‘हिंदु धर्म’ याविषयी माहिती सांगण्यास विनंती केली.

धर्माविषयी सध्याच्या रूढ चाकोरीतील विचार, सदोष व असमर्पक वाटत असल्याने, मला, डॉ. टाल्बर्ट यांचे निमंत्रण स्वीकारणे अशक्य होते. आपला विशिष्ट धर्मपंथच परम श्रेष्ठ – एकमेवाऽद्वितीय – One without second अशा प्रकारची निष्ठा असणाऱ्या संप्रदायानी, निरनिराळ्या धर्मपंथांची माहिती करून घ्यावयाची ती कशाकरता असू शकेल? आपल्या धर्माचे अद्वितीयत्व सिद्ध करण्यासाठी, दुसऱ्या विविध पंथांचा परिचयही अवश्य असतो; म्हणून अशा तुलनात्मक अभ्यासाची जरूरी असते.

पण, ‘सर्व धर्म–समन्वय,’ ‘सर्वधर्म परिषदा’ अशासारखे विचारही प्रभावशाली होत असलेले नाकारता येत नाही! शिकागोची जगद्विख्यात सर्वधर्म महासभा कित्येक वर्षांपूर्वीच साजरी झाली. भारतीय संस्कृतीच्या पुनरोत्थानाचे प्रणेते विवेकानंद यानी ‘हिंदु’ धर्माची ध्वजा फडकविली ती

प्रथम तेथेच ! पण अशा प्रसंगी प्रतिपादले जाणारे विचार – सर्व धर्म 'समान' वा 'समन्वय' दृष्टी-ही किती भुसभुशीत भूमिकेवर उभी आहे, हे अजून स्पष्ट झालेले दिसत नाही !

'राम, रहीम झरतुष्ट्र – सर्वही एकाच देवाची वा तत्त्वाची वेगळी नावे होत असे प्रतिपादिले जाते; हे ठीक आहे, वरकरणी. पण आपल्या धर्माच्या विशिष्ट नामरूपाचा पंथीय अभिनिवेशही टिकवून हा सर्वधर्म-समन्वय होऊ शकतो का ? हा प्रश्न धसास लावून पाहणे जरूर आहे.

अन्वय-समन्वय यात, स्थान– मानाचा– मूल्याचा प्रश्न येतो. श्लोकाचा अन्वय– अर्थ लावताना, त्यातील प्रत्येक पदाचे 'स्थान' – मूल्य– लक्षात घेणे जरूर असते. कर्ता, कर्म, क्रियापद, विशेष्य विशेषण ही ठरीव मूल्यांची असतात. सर्वांना सारखे लेखणे व अनर्थाला आमंत्रण देणे, हे निराळे नव्हे.

मध्ययुगीन होयसळ-यादवांच्या वेळचा एक शिलालेख; या प्रसंगी संस्मरणीय ठरेल. सर्व धर्मसंप्रदायात एकोपा जरूर आहे, हे उदात्त पातळीवरून पटवून देणारा बुद्धिवाद त्या शिलालेखात उघडकीस आला आहे. 'यं शैवाः समुपासते शिव इति, ब्रह्म इति वेदांतिनः . . .' विश्वाधारक मूळ तत्त्वाची ही निरनिराळी नावे आहेत, म्हणून धर्मावरून भांडणे अर्थविहीन आहे. . . . हा समत्वाचा विचार प्राचीन काळापासूनच प्रचलित आहे. पण धर्मपंथीयांतील ईर्षास्पर्धा, युद्ध काही थांबलेले दिसत नाही !

विख्यात इतिहाससंशोधक टाइनबी यानाही आश्चर्यकारक वाटत असलेली गोष्ट ती हीच. 'ज्युडाइझं' ( इस्त्रायलींचा पंथ ), क्रिश्चियानिटी व इस्लाम' हे तीनही संप्रदाय एका मुळातून वाढलेले आहेत; तरीपण याच्यातील संघर्ष– धार्मिक पातळीवर शतकानुशतके टिकून राहिला आहे !

अशा या पार्श्वभूमीवरून पाहता ( कोणत्याही ) धर्मपंथाचा विचार, चर्च–देऊळ–मठ, अशा ठिकाणी अभिनिवेशविरहित तटस्थवृत्तीने होऊ शकेल काय, याविषयी मला बलवत्तर शंका असल्याचे, डॉ. टालबर्टना स्पष्ट सांगितले पण त्यानी एक महत्त्वाचा प्रश्न टाकला. ही वस्तुस्थिती खरी आहे, असे क्षणभर मानले तरी यातूनही काही नवा मार्ग निघतो का हे पाहणे जागतिक प्रगतीच्या दृष्टीने जरूर आहे ना ? म्हणून आपण ( आपल्या चर्चमधे, कोणताही आडपडदा न ठेवता धार्मिक विषयाची–प्रगतीच्या दृष्टीने– चर्चा व्हावी अशी ) ही योजना आखली असल्याचे, त्यानी सांगितले !

एकूण धार्मिक श्रद्धेची युक्तायुक्तता, सर्व देशातही दिसत असणारी जीवनविषयक वैफल्याची भावना, सामाजिक अस्वास्थ्य. . . अशा प्रश्नाविषयी

काही विचारवंत जिज्ञासूंशी चर्चा झाली. अशा ३–४ प्रसंगी, पुढे मांडलेला आशयही यात येतो. हे निवेदन दोन विभागात येणार आहे. १) धर्माच्या विशिष्ट, नावाविषयी प्रथम दोन शब्द; व २) या धर्माच्या तात्त्विक बैठकी (Basic form) विषयी दोन शब्द, शेवटी.

२) आपल्या धर्माच्या 'हिंदु' या नावाचा मागोवा

ख्रिस्ती व महंमदी धर्माच्या संदर्भात भारतीयांचे धर्म-सूचक 'हिंदू' हे नाव बि-लक्षण वाटते ! या धर्माचा संस्थापक कोण ? अशासारखे बोचक प्रश्न डोकावले आहेत. या शंका निरसनार्थ प्रयत्नही झाले. पण मुळातच या धर्माचे 'हिंदू' हे नाव उपरी वाटते. हे नाव फारसे प्राचीन नाही; शिवाय 'हिंदु' हे नाव धार्मिक ग्रंथात, – धार्मिक परंपरेत – आढळत नाही हे दुर्लक्षिले जाते.

'हिंदु' या नावाचा 'सिंधु' या महा नदाशी संबंध असल्याचे सर्वमान्य आहे. इराण व भारत या दोनी भागांचा फार पुरातन काळापासून संबंध होता. इराणातील प्राचीन अवेस्ता ग्रंथाची व भारतीय ऋग्वेदाची भाषा मूळतः समान असल्याचे दिसून आले आहे. इराणी जनाला, त्या काळी, भारत हा देश ( इराण व भारत या दोनी देशामधील ) सिंधू या महान् नदावरून ओळखला जात होता. भारतीय म्हणजे 'सिंध' ( तीरावरील ) लोक, असा समज असावा. अवेस्तातील सोम > 'होम' असा उच्चारला जातो; तसा 'सिंधु' हा उच्चार 'हिंदु' या स्वरूपात झालेला स्पष्ट दिसत आहे.

एका काळी सिंधूला असलेले धार्मिक महत्त्व गंगेलाही नव्हते ! सिंधू – सरस्वती नद्यांचे महत्त्व पुढे गंगा – यमुनेला येते; वेदकालीन पवित्र सिंधू नदीवरून या संपूर्ण देशाला 'हिंदु-स्थान' असे नाव प्राप्त झाले; धर्मालाही याचप्रमाणे 'हिंदु' नाव रूढ झाले, असे मानावे खरे; पण याला प्राचीन पुरावा नाही. आज सिंधूचा समावेश पाकिस्तानात होत आहे ! 'हिंदू' धर्म प्रतिपालक म्हणविणाऱ्या शिवाजीला 'गोब्राह्मण प्रतिपालक' असे बिरुद असल्याचे समजते. विजयनगरच्या राजांच्या ताम्रपटात, त्याना 'हिंदुराय सुरत्राण' असे संबोधिलेले आढळते, ऐतिहासिक स्वरूपात 'हिंदु' हा निर्देश, १५–१६ व्या शतकापूर्वीचा, प्रकाशात आलेला मला माहीत नाही. त्यावेळी 'हिंदुराय सुरत्राण' या संकेताची आवश्यकता का भासली, हे 'सुरत्राण' या शब्दावरूनच उघड होत आहे. विजयनगर राज्याचे प्रतिस्पर्धी गुलबुर्ग्याचे बाहमनी राजे होत. हे राजे मुसलमानांचे 'सुलतान' जसे, तसे आपण 'हिंदु (जनाचे) सुलतान,' होय, म्हणून जाहीर होण्याच्या दृष्टीने हे बिरुद प्रचलित झाल्याचे

दिसते; 'सुर-त्राण' हा संकेत संस्कृत नव्हे. 'सुलतान' या संकेताचे 'संस्कृत' रूप आहे. संस्कृत साहित्यात इतरत्र न आढळणारा हा शब्द, विजयनगर राज्याच्या वेळी नवीनच उद्भवलेला दिसत आहे.

'हिंदुराय' या प्रयोगातील 'हिंदु' या संकेताला विशिष्ट जनवाचक अर्थ संभवतो. ब्रिटिशांच्या कारवाईत हा देशवाचक वा जनवाचक संकेत धर्मसूचकही बनू लागलेला उघडकीस येत आहे. राष्ट्रीय महासभेतून, मुसलमान वर्ग बाहेर काढण्यात ब्रिटिशांचा डाव यशस्वी होतो; व राष्ट्रीय महासभा 'हिंदू'ची असा बभ्रा सुरू होतो. आणि 'हिंदु' म्हणजे कोण? हा यक्षप्रश्नही ब्रिटिश राजकारणी वारंवार पुढे मांडीत असत. जैन बौद्ध हे 'हिंदू' नव्हेत, अशी टूम निघाली! शीखांना वेगळेपणाची जाणीव करून देण्यात आली! लिंगायत, आपण 'हिंदुपेक्षा वेगळे' असे सांगू लागले. राजकीय हक्क मागण्याच्या दृष्टीने हा सर्व डाव चालला होता.

या संदिग्धकाळी 'हिंदु' म्हणविणाऱ्यांच्या पुढाऱ्यांना 'हिंदु' याची 'धर्म' वाचक व्याख्या सांगणे भाग पडले! लोकमान्य टिळकासारख्यांकडून संस्कृत श्लोक रचून 'हिंदु'त्व कशात आहे हे एका सूत्रात सांगणेचा प्रयत्नही झाला. पण सावरकरांनी 'हिंदुस्थानात राहणारा तो हिंदू' म्हटले. अशा अनेक घटनांवरून 'हिंदु' हा संकेत मुळात धर्मसूचक नाही हे स्पष्ट होत आहे. ब्रिटिशांनी निर्माण केलेल्या विचित्र परिस्थितीला तोंड देतेवेळी, भारतीय पुढाऱ्यांना, 'हिंदु' हा संकेत धर्मसूचकही असल्याचे मान्य करण्याचा प्रसंग ओढवला, हे वरवर पाहताही कळण्याजोगे आहे!

## ३) तर या संप्रदायाचे, परंपरेशी सुसंगत असे कोणतेच नाव नसेल काय?

वेदकालीन मूळ परंपरा विच्छिन्न झाल्याने ही आपत्ती ओढवली आहे. वेदकाळीच पूर्वीची सवितृ उपासना गौण होते व 'पुरुष' पूजा प्रतिष्ठित होऊ लागते, मूळ ऋग्वेदीय सवितृ संप्रदाय (प्रकाश-तत्त्वपूजकांचा) कसाबसा विकृत स्वरूपात प्रचारात राहतो. वैश्वावर आराधनेत कृतार्थता मानणाऱ्या दृष्टीची 'संगच्छध्वं ... संवदध्वं' अशा जीवनादर्शाची ऋग्वेदीय प्रार्थना मागे पडते. 'वैश्वानर' यातील विशाल अर्थ लुप्त होऊन हा 'जठराग्नी' (भुकेच्या स्वरूपातील मृत्युसंकेत) झालेला 'भगवत्' गीतेत आढळेल! हा गीतेतला 'पुरुष': भग-वान्, विवस्वताला 'योग'दीक्षा मी दिली. (इमं विवस्वते: योगं

प्रोक्तवान् अहं ) असे म्हणतो; या उल्लेखात प्राचीन विवस्वन् (: सवितृ : प्रकाश) पूजासंप्रदाय भ्रष्ट केल्याची– झाल्याची– कबूली मिळते. विवस्वन् परंपरेतील ' मनु ' हा, ' मद्भावा मानसा जाता: 'अशा आपल्या मानसपुत्रात ओढून घेणारा हा ' भग–वान् ' पुरुष, हाच सवितृपरंपराविच्छेदक असल्याचे, या निराळ्या उल्लेखावरूनही दृढ होत आहे.

भारतात वेदकालीन विवस्वन्-- मनु परंपरेचा, हा, ' धर्म ' तगला असता तर, हा संप्रदाय कोणत्या विशिष्ट नांवाने ओळखला गेला असता, हे ताडणे दुष्कर नाही, विवस्वन् ( प्रकाश ) पूजा संप्रदायाचा ' मनु ' प्रणीत हा धर्म विश्वानर = वैश्वानर उपासनेचा असणार. म्हणून या मनूचा हा ' मानव धर्म 'च असणार, पण ' मानवधर्मशास्त्र ' या नावाच्या, मनुपरंपरेच्या या ग्रंथात मानवतेला कलंक लावणारे विधिनियमही आढळतात ! पण या ग्रंथाच्या मूळ नावावरुन अभिप्रेत ठरणाऱ्या विचाराना विरोधी बाधक भाग– असंबद्ध, असंगत विचार–काढून दुरुस्ती करण्याची जबाबदारी पुढील प्रत्येक पिढीच्या नेत्यावर येते; पण मूळ परंपराच विघटित झाल्याने ' मानवधर्म शास्त्र ' ही विकृत स्वरूपात आढळले तर याला उत्तरदायी कोण म्हणावयाचे ? वैश्वानरप्रतिमा विकृतीला कारण असणाऱ्यावरच ' मनु ' धर्मशास्त्रविकृतीची ही जबाबदारी येऊन पडत नाही काय ?

आजचा हिंदु या असमर्पक, सदोष नावाने ओळखला जाणारा हा धर्म मुळात वैश्वानराला आदर्श मानणारा आहे म्हणून, पूर्वपरंपरेशी या धर्माचे सुसंगत नांव ' मानव धर्म ' हेच सुयोग्य ठरते. पण मनूची हीं स्मृति ', विचलित होते. नव्या ' आगमांचे ' प्रस्त माजते ! ' स्मृति 'वर आधारलेला ' स्मार्त ' धर्म, टीकास्पद होतो; पंचरात्र, आगमादीवर आधारलेले संप्रदाय फोफावतात, वेद-कालीन मूळ ' वैश्वानर ' उपासनेचा, ' मानवधर्म ' मागे पडून ' पुरुष ' ( : गुरु ) पूजा प्रधान पारलौकिक दृष्टीचे विविध नवे पंथ प्रचारात येतात; यावरूनही, आज ' हिंदु ' धर्म म्हणून ओळखल्या जाणाऱ्या संप्रदायाची परंपरा अतूट राहिली असती तर, हा संप्रदाय ' मानवधर्म ' या नावानेच ओळखला गेला असता, असे म्हणणे भाग आहे.

## ४) धर्माचे ' हिंदु हे नाव स्वीकारल्याने, भारतीयांची धार्मिक पूर्व-परंपरा, व सलग इतिहास कळणे अशक्य झाले आहे !

' स्मृति ' व पंचराञ्यादी दोनी परंपरातील जीवनदृष्टीत मोठा मूलगामी फरक आहे: पण हा फरक ' हिंदु ' या उपऱ्या नावामुळे लक्षात येत





नाही; व हा फरक जाणण्याची आवश्यकताही डोकावली नाही ! वेदात आढळणारे, 'मनवे हिताय' यासारखे निर्देश, पुढील काळातील 'मानव धर्मशास्त्र या संकेताचे औचित्य प्रत्ययास आणून देत आहेत. 'मनु' हा संकेतच मुळात 'मानव' या अर्थी आहे. ( म्रो. वि. कोश पाहा ) धर्मशास्त्राला 'मानव-धर्माचे शास्त्र' अशा अर्थाचे नाव दिले जाते हे निष्कारण नव्हे. या नावाला पूर्वपरंपरा असेल काय ?- याचा विचार आजपर्यंतही न होण्याचे कारण काय ? हिंदू असे आपल्या धर्माचे चुकीचे नावच याला मुख्य कारण होय, असे म्हणावे लागते.

प्रवृत्तिपर व निवृत्तिपर अशा 'द्विविधा निष्ठा' प्राचीन काळापासूनच आहेत, असे गीताच सांगते; हे खरे तर, 'मोक्ष' ( निवृत्ति ) मार्ग प्रतिपादक गीता-उपनिषदे या परंपरेप्रमाणे, प्रवृत्तिमार्ग प्रतिपादक आणखी एक परंपराही या देशात असणारच. तर ती कोणती ? याचे संशोधन होणे जरूर आहे. 'पिंड-ब्रह्मांड ऐक्य' या भूमिकेवरील धार्मिक वृष्टीत समाज-समष्टीस = 'विश्वानर' विचारास, अवकाश असू शकत नाही. वैयक्तिक मोक्षाला महत्त्व दिले जाते. या प्रकारच्या जीवनात 'समानं मनः' हा विचार मान्य नसणार; 'व्यक्ती तितक्या प्रकृति' हा व्यक्तिवाद; 'समान' ( common ), आणि सामान्य ( general ) हे 'विशिष्ट वाद' व्यक्तिवाद, लेखी धरत नसतो. पण ऋग्वेद संहितेच्या शेवटी येणारा व या ग्रंथातील आशयसूचक 'समानो मंत्रः... समानी आकूतिः हा मंत्र, 'संगच्छध्वं' हा आदेश मानवधर्माशी सुसंगत वाटतो.

ही वैश्वक स्वरूपाची मूळ प्राचीन परंपरा लक्षात न घेण्याने या धर्माला 'ख्रिस्ती,' 'इस्लामी' अशा स्वरूपाचे एक विशिष्ट नाव का नाही, याचा उलगडा होणे दुष्कर झाले आहे. 'समानं' व 'सामान्य' यात 'विशिष्ट' सामावले जाते. विशिष्टाचे निराळेपण अलग राहत नाही पण विशिष्टांचा आधार नसणारे 'समान' या 'सामान्य' आपल्या नावाला अर्ह होऊ शकत नाही. आणि 'मानव धर्म' म्हणताच तो जसा व्यक्तिविशिष्टच नसणार, तसा देशविशिष्टही असू शकत नाही. वैयक्तिक धर्मातील 'साधारण' भाग यात समाविष्ट असतो. यामुळेच भारतीय पुरातन परंपरेत, 'क्रिस्त' 'महंमद' अशा सारख्या वैयक्तिक माहात्म्यसूचक नावाना एकमेवाऽद्वितीयत्व लाभले नाही !

पण पूर्वी भारतीय धर्म, वैश्वक स्वरूपाचा म्हणजे, विश्वानर (: वैश्वानर) उपसनाप्रधान होता; आणि या मूलभूत धारणेला सुसंगत असे, या

संप्रदायाला विवस्वन् ( प्रकाशतत्व ) परंपरेतील 'मनु' प्रणीत 'मानव धर्म' म्हणत असत; आणि आजही व्यत्यस्त, विकृत स्वरूपात उपलब्ध असणारा 'मानवधर्मशास्त्र' या नावाचा एक ग्रंथ याची साक्ष पटवतो; हे म्हणणे खरे असेल तर, या वैश्वक दृष्टिकोनाचा हा धर्म, व्यक्ति-विशिष्ट आत्मकेंद्रित उपासनासंप्रदायापुढे टिकाव न लागता, वैश्वानर उपासनेची ही विवस्वन्– मनु परंपरा, कोलमडून पडली असे म्हणावे लागते; –प्रचलित ऋग्वेदपाठ, उपनिषदे, गीतादि ग्रंथ पाहता; या सर्व ग्रंथातून 'मोक्ष' मार्गाचे प्रतिपादन असल्याचे श्री शंकरादि सर्वही आचार्यांत एकमत आहे.

म्हणून, वैश्वक स्वरूपाच्या 'मानवधर्माला' काही एक विशिष्ट नाव असणे, मूल भूमिकेशीच विसंगत आहे, हे मान्य केले तरी, ही वैश्वानर उपासना परंपरा विसकटली जाऊन, नंतर प्रभावशाली झालेल्या, 'पुरुष' ( : नारायण = अश्वत्थवृक्ष ) भक्तिपंथसूचक एखादे नाम विशेष तरी प्रचारात यायला पाहिजे होते; पण असे तळपत असणारे एखादे विशिष्ट नाव दिसत नसण्याचे कारण काय ? हा प्रश्नही महत्त्वाचा होय.

५) पुरातन अविच्छिन्न परंपरांतील अंत:संगती विसंगतीच्या शास्त्रीय सूक्ष्म व्यासंगाच्या अभावामुळे ऐतिहासिक स्वरूपाच्या वास्तव्य सत्याला मुकावे लागत आहे.

काल → आज → उद्या ही कालगतीची अविच्छिन्न साखळी आहे. 'काल' व 'आज' यांत अतूट संबंध आहे. 'काल'चा काही अंश 'आज' मधे, तसेच पुढे 'उद्या' मधेही राहात येतो. आजही काहीएका स्वरूपात तगून असणारी अश्वत्थ:वृक्ष ( : पुरुष = नारायण ) पूजा, वेदपूर्वकालीन म्हणून गणल्या गेलेल्या सैंधवसंस्कृतीतही, तत्कालीन काही एका विशेष स्वरूपात जिवंत होती, सिंधु तीरावरील पुरातन 'पुर' संस्कृतीचे अवशेष उत्खननात, प्रकाशात आले आहेत. यावर सचित्र ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. या अवशेषात मिळणाऱ्या 'अश्वत्थ' वृक्षाच्या प्रतिमा विशेष अभ्यसनीय आहेत. हा वृक्ष सांकेतिक स्वरूपाचा आहे. ९ पानांचा हा पिंपळ असून दोन ( एकशृंगी ) प्राणी या वृक्षाशी सं-लग्न आहेत.* ऋग्वेदात 'अश्वत्थ' आणि 'पिप्पल' या दोनी नामांतराने या वृक्ष ( पुरुष ) दैवताचे वर्णन येते; पण वेद व उपनिषदांतील

* म्हैसूर विद्यापीठाने प्रकट केलेल्या 'ऋग्वेदसार : नागप्रतिमा विचार,' या ग्रंथात हे विवरण आहे. व त्रिवर्णचित्र मलपृष्ठावर आहे.

या वृक्षाला ' दोन सुपर्ण ( पक्षी ) अडकले आहेत. गीतेतील वृक्षाच्या वर्णनात हा निर्देश नाही !

येथे लक्षात घ्यावयाचा मुद्दा हा की, भारतीय संस्कृतीची अविच्छिन्न 'सनातन' परंपरा या अश्वत्थ : पिप्पल ( : पुरुष ) पूजा प्रकारात आजपर्यंत काही फरकाने चालत आलेली आढळते ! संतानप्राप्तीकरता ही वृक्षपूजा असल्याचे आजही मान्य आहे. संप्रदायानी तगवून आणलेला हा जिवंत भूतांश ( Living past ) ऐतिहासिक स्वरूपाच्या घटनावर प्रकाश टाकण्यास समर्थ असतो; मात्र अशा पुराव्याला निरनिराळ्या दिशेने ताळा-पडताळा मिळत असावा.

वेदातील वसिष्ठ व विश्वामित्र ही दोनी नावे विशिष्ट व्यक्तींची असे मानण्यापेक्षा या नावातील सार्वकालिक सांकेतिक अर्थाकडे पाहणे अवास्तव होणार नाही, असे वाटते; कारण या दोनी नावामागील सांप्रदायिक कथाभाग, भारतीय संस्कृतीतील एका स्थित्यंतरावर– सांस्कृतिक विघटनेवर प्रकाश टाकीत आहे.

'सवितृ' उपासना मंत्रद्रष्टा म्हणून विश्वामित्राची ख्याती आहे. हा सवितृ संप्रदाय विश्वा-नर, वैश्वानर उपासकांचा होय. या पार्श्वभूमीवर विश्वामित्राचे नाव मुळात अन्वर्थक असावे असे म्हणण्यास जागा आहे.

याचप्रमाणे ' वसिष्ठ ' या नावाचा मागोवा घेणेही उपयुक्त ठरेल असे वाटते. ' वसिष्ठ ' या संकेताला मूलतः श्रेष्ठ–वरिष्ठ असा विशेषणवाचक अर्थ आहे. मोनियर् विल्यम्स् कोशात, most excellent, best, richest, या अर्थाचे, वेद, ब्राह्मण, व छां. उपनिषत्, महाभारतात विशेषणार्थी प्रयोग आढळतात, असे सूचित केले आहे. अवेस्तातील 'अश वहिष्ठ'चे 'अशवसिष्ठ' असे संस्कृत रूप होत असून 'अश ( : ऋत )' हे अत्यंत वरिष्ठ आहे, श्रेष्ठ आहे असा याचा अर्थ होतो.

अत्यंत श्रेष्ठ ( most excellent ) या अर्थाचे विशेषण, एका व्यक्तीचे नाव ठरावे– ठरविले जावे, या मागे काही कार्य–कारण संबंध नसेल काय ? वेदकाळी ' वसिष्ठ ' या नावाची व्यक्ती, 'विश्वामित्र ' नामक व्यक्तीची प्रतिस्पर्धी होती ( आणि सांकेतिक पातळीवर आजही आहे ! ) अशी कथा प्रचलित आहे, हे कोणीही अमान्य करणार नाही. पण या कथेत सांकेतिकता दिसत असूनही, या पातळीवर अजून चर्चा व्हावयाची आहे !

अनुक्रमणिका

'सवितृ (प्रकाश) मंत्रद्रष्टा विश्वामित्र हा, अंधाराचा, 'रात्र' उपासकांचा विरोधी असणार, हे उघड आहे.* वरुण पुत्र म्हणविणारा वसिष्ठ 'रात्र' उपासना परंपरेतला आहे, हे सिद्ध करण्याची आवश्यकता नाही. कारण 'वरुण' हे 'रात्र्यभिमानी' दैवत आहे असे ऋग्वेदभाष्यकार सायण सांगतात, आणि भारतीय परंपरेत याला भरपूर पुरावा आहे. विष्णूचा अवतार मानला जाणारा 'कृष्ण' (: काळा) हा 'वरुणो यादसां अहम्' असे सांगतो? विष्णु-कृष्ण उपासना मुळांत रात्र संप्रदायाची आहे. (याचे विवरण पूर्वी आले आहे. नवभारत, मार्च ७३, वसिष्ठ कोण; तसेच सप्टेंबर पा. ८८, ९४, ९८ अक्टोबर ७३ अंक, पा. ५४, ५५ पाहा).

'काल' गतीची जाण मूलतः चंद्रावरूनच प्रथम आली हे निर्विवाद आहे (नवभारत नोव्हेंबर ७३ पा. १७) महिन्याचे मानदंड चंद्र आहे, सूर्य नव्हे! आणि सर्वप्रथम चंद्राची (: रात्रीची) उपासनाच प्रचलित होती, याचे प्रत्यंतरही येथेच मिळते. भारतातच नव्हे तर इजिप्त, सुमेर, ग्रीक संस्कृतीतही हेच आढळते. 'मास' (मस् = चंद्र) सूचक पाश्चात्य संकेत month हा moon चंद्राशी निगडित आहे.

'प्रकाश' (: सूर्य, सवितृ) पूजा, चंद्र–रात्र–पूजेनंतर प्रचलित होते; पण चांद्रपंथीय सनातन अभिमान उफाळून वर येतो. व 'प्रकाश' उपासनेवर मात करतो. वरिष्ठ, श्रेष्ठ संप्रदाय तो आपलाच हा दावा रात्र- चंद्र पूजकांचा, या पार्श्वभूमीवर ऋग्वेदातील विशिष्ट व्यक्तिसूचक 'वसिष्ठ' या नामरूपाचा उलगडा होत आहे; तज्ज्ञानी पुनः तपासून पाहावे : (आपण) आपला पंथ हाच श्रेष्ठ असा अभिनिवेश विशिष्टवादी भूमिकेचा होणे अटळ आहे.

पुराणकथा पंथप्रचाराकरता उपयोगी पडत आल्या आहेत, हे विसरून चालणार नाही. हरिश्चंद्राच्या कथेला मिळालेली कलाटणी या दृष्टीने उद्बोधक होईल. 'पुत्र झाल्यास वरुणाला अर्पण करतो' असे मागून घेणारा हरिश्चंद्र, मुलगा जन्मल्यावर देवालाच फसविण्याकडील कल दिसू लागतो, या कथेचे पडसाद ऋग्वेदांतच कानी येतात (I. २४) ही कथा ब्राह्मणग्रंथातही येते पण पुराण-कथांतील हरिश्चंद्र, सत्याचा पुतळाच जणू असे दिसते. पण हा हरिश्चंद्र निराळा म्हणावयासही जागा नाही! कारण, हा हरिश्चंद्र स्वप्नांतले सत्य (म्हणजे

* अवेस्तातील प्रकाशरूप अहुर्मज्द हा अंधाररूप अहिमानचा विरोधी; ह्याचा संबंध इंद्रवृत्रातही आहे. तपासून पहा.

' रात्रसत्य ') पालन करणारा असतो, ही सांकेतिकता मौलिक आहे. आणि सवितृ = प्रकाश उपासना प्रचलित करणारा विश्वामित्र, या कथाद्वारे खलनायक : नराधम ठरावा या घटनांतील अंतःसंगती अभ्यसनीय नाही काय ? वसिष्ठ हा यातु (जादुटोणा) कृत्यात निपुण होता, म्हणून अपवाद होता. जे लोक आपणास यातुवाला म्हणतात त्यांचा नाश होवो म्हणून जळफळाट करणारा वसिष्ठ ऋग्वेदांतच आहे. ( VII १०४ ) हा त्रागा पाहून Lady you hardest too much असे म्हणणारे आहेत !

प्रकाश : ( सवितृ ) उपासनेपूर्वीची पिप्पल : अश्वत्थ : वृक्ष ( = पुरुष; नार-अयन ) उपासना आजपर्यंत तगून येते; काल-गतीची जाण प्रथम चंद्रो-पासनेत,--रात्रसंप्रदायात--डोकावली आहे. आजही सर्व धार्मिक तिथी, सण समारंभ चांद्रमान पंचांगाप्रमाणे चालतात. सौर पंचांग आजही नाही; अधिक मासाच्या योजनेने सौर व चांद्रमानातील त्रुटी भरून घेतली जाते, वसिष्ठ हा सवितृ-प्रकाश संप्रदायाच्या विश्वामित्राला पाण्यात पाहतो; वसिष्ठ हा ' नारायण कन्या ' उर्वशीपुत्र म्हणविलो. ऋग्वेदातील ' शिपिविष्ट ' विष्णु ( = नार-अयन ) हेच एकमेव श्रेष्ठ दैवत होय, असे प्रतिपादन करतो. डॉ. राधाकृष्णन् व प्रा. वेलणकर सांगतात की नारायणसंप्रदायी दास्य-भक्तीचा उगम ऋग्वेदातील वरुणपुत्र वसिष्ठाच्या सूक्तांत ( ७ व्या मंडळात ) आढळतो, भगवद्गीतेतील शरणभक्ती आजही आदर्श मानली जाते. ' नारा-यण ' यालाच, ' पुरुष ' : नारायण, अश्वत्थ : नारायण ( = वृक्ष), अश्वत्थ = पुरुष असे म्हटले जाते.

कालाच्या पोटातील आजही जिवंत असणारे भूतकालीन अंश, हा आणि आजच्या जीवनातील आचार-विचारात आढळणाऱ्या संदिग्धार्थाच्या गोष्टींची पाळेमुळे ' काल 'च्या पोटात दिसत असून, या दोहोत अंतःसंगती आहे असे ठरेल तर अशा गोष्टी, ऐतिहासिक सत्यांशावर प्रकाश टाकीत असतात; ऐतिहासिक स्वरूपी जीवनसत्य पडताळण्याचा हा एक आडाखा ठरला आहे.

६) या वरील प्रकारच्या अंतःसंगतीवरून, आज ' हिंदू ' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या धर्मांचा प्रणेता ' वसिष्ठ ( = व्यास ) हाच ठरतो.

या वसिष्ठाला ' प्रजापती ' पदावर स्थापन करण्यात ( मनु I. ३५ ), हा महापुरुष भारतीय ( धर्म ) सृष्टीचा कर्ता अशी स्पष्ट सूचना आहे. वसिष्ठ व व्यास या दोन निराळ्या व्यक्ती असाव्या असा भ्रम निर्माण केला गेला

आहे. पण महाभारताच्या नांदी श्लोकाने या भ्रमाचा भोपळा फुटून तुकडे होत आहेत :

> व्यासाय विष्णुरूपाय, व्यासरूपाय विष्णवे,
> नमोवै ब्रह्म निधये वसिष्ठाय नमो नमः ।।

– याच संदर्भात नारायणाचे नावही पुढे येते. या श्लोकावरून व्यास = विष्णु = वसिष्ठ = नारायण असे संप्रदायमान्य समीकरण असलेले उघडकीस येत आहे.

'व्यासोच्छिष्टं जगत् सर्वम्' या परंपरागत निष्ठेप्रमाणे, व्यास हाच 'प्रजापति' असल्याचे पर्यायाने सिद्ध होत आहे. वसिष्ठाला 'प्रजापति' मानण्यातील औचित्य विचारार्ह आहे. विष्णुदैवताच्या ऋग्वेदीय स्वरूपावरून विष्णु हा 'प्रजापति' आहेच. गर्भाधान संस्काराच्या संदर्भात 'विष्णुः योनिं कल्पयतु' ( x. १८४.१ ) असा मंत्र येतो, शिवाय, वसिष्ठच विष्णूला 'शिपिविष्ट' रूपांत पाहतो, 'शिपिविष्ट' विशेषण लिंगस्वरूपी म्हणून सर्वमान्य असणाऱ्या रुद्राचेही नाव होय !

या पार्श्वभूमीवर 'व्यासाय विष्णुरूपाय' म्हणजे हे 'व्यास' रूपही, 'शिपिविष्ट'च होय. 'नारायणा'चा निर्देशही वरील श्लोकात येतो, म्हणून शिपिविष्ट हे नारायण (नार-अयन) आहे. आणि याच समीकरणांत सामावणारा वसिष्ठ' हा 'दक्षिण कपर्द' (शिपिविष्ट ) म्हणजे काय, याचाही उलगडा होत आहे.

म्हणून वसिष्ठ = व्यास याना 'प्रजापति' म्हणण्यात औचित्य नाही असे म्हणता येत नाही.

प्रचलित धर्मसंप्रदायाला आकार देणारा व अष्टादश पुराण शास्त्रादींचा कर्ता व्यास = वसिष्ठ हाच प्रचलित 'हिंदू' धर्माचा जनक होय. पण व्यास किंवा वसिष्ठ या विशिष्ट नावाने हा हिंदू धर्म ओळखला जात नाही, याचे कारण काय ?

७) याचे प्रधान कारण, भारतीय विचारवंतात भिनलेली तत्त्वनिष्ठा वा वैश्वक दृष्टि होय.

'आहे' आणि 'नाही' ( : सत्–असत् ) हे दोनी एकाच वेळी पाहण्याच्या वैशिष्ट्या– ( नवभारत ऑ. ७३; पा. ९९ ) –मुळेही नारायण–विष्णु–वासुदेव संप्रदायाच्या प्रस्थापकाचे, म्हणजे वसिष्ठ वा

व्यासाचे नाव उघड्या डोळ्याना वरवर दिसत नाही; शिवाय विश्वामित्राचा पाडाव केल्याची कबूली दिल्यासारखी होईल, म्हणूनही संस्थापकाचे हे नाव स्पष्ट सांगण्याची प्रथा गौरवास्पद ठरली नसावी ! तरीपण, “ भूतानि समकृण्वन् ” म्हणून, तसेच सर्वशास्त्रादि रचणारा, या संस्कृतीचा प्रणेता म्हणून व्यास = वसिष्ठ आजही वंद्य आहे. ‘ व्यास ’ पौर्णिमा हे याचे निदर्शक आहे.

म्हणून ख्रिस्त महंमद आणि बायबल, कुराण यासारखा व्यक्तिप्रामाण्याचा हा प्रकार भारतीय संप्रदायात नाही, असे म्हणणे हे अर्धसत्य आहे. ‘ व्यास ’ रूपात वसिष्ठ असून कृष्ण ( विष्णु ) संप्रदायातच काय, शांकर शैवातही ख्रिस्ती बायबल–कुराणाप्रमाणेच, भगवत्-गीता पण, सर्वसंप्रदाय मान्य एकमेव महत्त्वाचा मौलिक ग्रंथ आज प्रचारात आहे. या ग्रंथाला बायबल–कुराणाप्रमाणे राष्ट्रीय महत्त्व प्राप्त व्हावे असे प्रयत्नही चालू आहेत, विश्वविद्यालयीन पदवीदानाच्या वेळी स्नातकाला गीतेची प्रत दिली जावी असा मानस व्यक्त केला जात आहे.

या प्रसंगी लक्षवेधी मुद्दा हा की, जगातील ख्रिस्त, इस्लामादि एकेका नामवैशिष्ट्याने प्रसिद्ध असणाऱ्या संप्रदायाहून प्रचलित हिंदू धर्मही संस्थापकाचे विशिष्ट नाव, व एकमेव प्रमाणग्रंथाचे नाव, बाह्यात्कारी स्वरूपात जगजाहीर नसेल; पण तात्त्विक भूमिकेवरील, हिंदूच काय जैन-बौद्धादी संप्रदायांच्या तळपायाची वैचारिक आकृती समान स्वरूपाची आहे; एवढेच नव्हे तर याना पूज्य अशा प्रधान प्रतिमा : संकेतातही साम्य असलेले आज सप्रमाण दाखविणे शक्य आहे; पण, याचे विवरण ‘ हिंदू ’ म्हणविणाऱ्या या धर्माच्या तात्त्विक पातळीवरील वैचारिक आकृतिस्वरूपाविषयीच्या ‘ दोन शब्दात ’ येणार आहे.



अनुक्रमणिका

श्री. हरिभाऊ रानडे

# ऋग्वेदातील सौरदेवता

आजपर्यंत अनेक भारतीय व पाश्चात्य पंडितांनी ऋग्वेदातील विविध देवतांचे वर्णन त्यामधील ऋचांच्या आधारे करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामध्ये सौरदेवतांची पण वर्णने आली आहेत. परंतु एक सूर्य सोडता कोणत्या देवतांना सौर देवता म्हणून संबोधावे याविषयी पंडितांमध्ये बराच वाद दिसून येतो. विशेषतः सौर देवतांचा वर्ग ही कल्पना कांही थोडयाच लोकांनी पुढे ठेवली आहे.[1]

अशा अवस्थेत ऋग्वेदामध्ये सूर्याचे नेमके स्वतःचे असे गुणधर्म कोणते आहेत हे पाहून त्या आधारे ते गुणधर्म स्वतःमध्ये अधिकाधिक सामावून घेणाऱ्या अन्य देवता कोणत्या हे निश्चित करावे लागेल व अशा प्रकारच्या माहितीच्या आधारावरच आपल्याला सौरदेवतावर्गाची स्पष्ट कल्पना येऊ शकेल. प्रस्तुत लेखात याच विचारसरणीला अनुसरून काही कल्पना पुढे ठेवण्याचा प्रयत्न करण्यात आला आहे.

प्रथम इतिहास-पुराण व दैवतशास्त्राच्या अभ्यासकांनी सौरदेवता या शब्दाचा प्रयोग कोणत्या प्रकारे केला आहे व त्यांना त्यापासून अभीष्ट काय आहे हे पहाणे उद्‌बोधक ठरेल. आणखी एक गोष्ट या दृष्टीने लक्षात येण्यासारखी आहे. ती म्हणजे ज्या ज्या पंडिताने ऋग्वेदांतील देवतांचे वर्णन करण्याचा प्रयत्न केला आहे त्या प्रत्येकाने देवतावर्गीकरण हा विषयपण

---

१. पी. एस्. देशमुख 'ओरिजिन् अँण्ड् डेव्हलप्मेंट ऑफ् रिलिजन्' पृ. २१८–१९ तसेच ए. बार्थ 'रिलिजन्स् ऑफ् इंडिया (भाषांतरित इं). लंडन् पृ. २०; परंतु या दोघांतसुद्धा मतभेद आहे. नेमक्या कोणत्या देवता हे त्यावरून कळत नाही. बार्थच्या मते आदित्यांचेच रूपांतर सौरदेवतात होते. ई हार्डीची सौरदेवता व चांद्रदेवता ही कल्पनासुद्धा अशाच प्रकारे संदिग्ध स्वरूपाची आहे.

अनुक्रमणिका








अवश्य हाताळलेला आहे. खुद्द ऋग्वेदातील उल्लेखावरूनसुद्धा देवतावर्गीकरणाची कल्पना येऊ शकते[1] अशा प्रकारच्या वर्गीकरणाचा पण आपल्याला विचार करावा लागेल. कारण या वर्गीकरणामध्ये सूर्य देवतेचे महत्व काही पंडितांनी फार मोठे असल्याचे मान्य केले आहे तर काहीनी सूर्याला नुसता एक तेजोगोल यापेक्षा अधिक महत्व देण्याचे कारण नसल्याचे प्रतिपादन केले आहे. खुद्द ऋग्वेदामध्येही दोन्ही विचार उपलब्ध होतात. काही ठिकाणी सूर्याला स्वर्गलोकाची प्रमुख देवता म्हणून सन्मान देण्यात आला आहे व त्याची बरोबरी अन्तरिक्षातील इन्द्र आणि पृथ्वीवरील अग्नि या देवतांशी करण्यात आली आहे.[2] काही ठिकाणी तर त्याला श्रेष्ठामध्ये श्रेष्ठ या अवस्थेपर्यंत सन्मानित करण्यात आले आहे[3] तर काही ठिकाणी त्याचे वर्णन नद्या, पर्वत इत्यादि निसर्गांगभूत सामान्य वस्तूंच्या बरोबरीने केले आहे.

पुढील काळामध्ये निरुक्तकारांनी[4] देवता वर्गीकरणावर आपले विचार स्पष्ट केले आहेत. त्यांना स्थानाच्या आधारावर ऋग्वेदातील देवतांचे वर्गीकरण करावे ही कल्पना संपूर्णपणे मान्य आहे; परंतु देवतामाहात्म्याविषयी त्यांच्या विचारात संदिग्धपणा दिसून येतो. उदाहरणार्थ सूर्य ही देवता स्वर्गस्थ देवतावर्गाची प्रमुख आहे. पण त्यामुळे त्या वर्गातील प्रत्येक देवतेमध्ये सौर गुणधर्म असलेच पाहिजेत ही कल्पना त्याना मान्य नाही. यामुळेच त्यांच्या मते वरुण, यम आणि सवितृ या देवतांचा समावेश स्वर्गस्थ आणि अन्तरिक्षस्थ अशा दोन्ही प्रकारच्या देवतावर्गामध्ये करण्यात आला आहे.

मॅक्डोनल्[5] ए. ए. हे प्रथम ऋग्वेदातील देवतांचे वर्गीकरण करणे किती प्रकारांनी शक्य आहे या गोष्टीचा विचार करतात. त्यामध्ये १) देवता मन्त्रांची गणना व त्या आधारे श्रेष्ठ व कनिष्ठ देवतांचे वर्गीकरण २) देवतांचे ऐतिहासिक दृष्टया वर्गीकरण आणि ३) देवतांमध्ये मानवी आविष्काराच्या आधारे वर्गीकरण या तीन प्रकारच्या वर्गीकरणांचा समावेश आहे. पण त्यांच्या मते या तीनही प्रकारच्या वर्गीकरणांचे काही खास

---

१. ऋ. १.१३९.११

२. ऋ. १.१३९.११

३. ऋ. ७.६६.१५

४. निघंटु अ. ५

५. 'वेदिक मायथॉलॉजि' स्ट्रास् बुर्ग, १८९७

दोष आहेत आणि त्यामुळे त्यांनी स्वत: स्थानावर आधारित यास्काचार्यांचे वर्गीकरणच उपयुक्ततेच्या दृष्टीने सोयीचे म्हणून मान्य केले आहे. पण यास्काचार्य आणि मॅक्डोनल् या दोघांच्या विचारात थोडासा फरक आहे. मॅक्डोनल् यांना स्वर्गस्थ देवतांमध्ये सौर गुणधर्मांचा आविष्कार सर्वतोपरी झाला असल्याचे दाखवावयाचे आहे आणि वर म्हटल्याप्रमाणे यास्कांना ते मान्य नाही. मॅक्डोनल् हे या वर्गातील सर्व देवतांची उत्पत्तीसुद्धा सूर्यापासून झाली असल्याचे प्रतिपादन करतात.[१] आणि त्यांनी केलेली मित्र, सवितृ, पूषन्, विष्णु, आदित्य, अर्यमन्, भग, अंश, दक्ष आणि उषस् या देवतांची वर्णने यादृष्टीने पहाण्यासारखी आहेत. या सर्व वर्णनांमधून त्या देवतांचा सूर्याशी असलेला संबंध अधिकाधिक जवळचा दाखविण्याचा प्रयत्न करण्यात आला आहे. थोडक्यात दुसऱ्या शब्दात सांगावयाचे म्हणजे स्वर्गस्थ देवतांचा वर्ग हा त्यांच्या मते सौर देवतांचाच वर्ग आहे. त्यांनी तसे स्पष्ट म्हटले नसले तरी त्यांना ते अभिप्रेत असावेसे वाटते.

हिलेब्रांट् हे सूर्यचंद्राचे माहात्म्य फार वाढवून सांगणारे म्हणून टीका ज्यांच्यावर झाली असे एक विचारक.[२] त्यांच्यामते इन्द्र आणि सूर्य या देवता एकच आणि देवता वर्गीकरण हा एक कठिण विषय आहे. कारण त्यामध्ये निश्चित सरणी अवलंबिणे दुष्कर असून अनेक ऋषिकुटुंबांच्या विचारांचा समावेश या संदर्भात करावा लागतो. त्यांनी स्वत: मात्र आपल्या सोयीच्या दृष्टीने देवतांचा विचार त्यांच्या चारित्रिक सोपेपणा आणि वैचित्र्य यावर आधारित केला आहे.

एम्. ब्लुम्फील्ड् यांच्या मते ऋग्वेदिक देवतांचा प्रमुख नेता असा कोणीही नाही. आणि त्यांचा समावेश सौरदेवता किंवा वादळांच्या देवता ( storm gods ) इत्यादी प्रकारांमध्ये करणे शक्य आहे. 'सौरदेवता' या प्रकारात त्यांना या ठिकाणी प्रकाशसंबंधी देवतांचा समावेश करावयाचा आहे.[३] अर्थातच अशा प्रकारच्या वर्गीकरणाच्या आधारे सौरदेवतांची नीटशी कल्पना येणे केवळ अशक्य आहे हे सांगावयास नकोच. त्यांनी देवतांचे एकूण पाच वर्ग केले आहेत : इतिहासपूर्व देवता, पारदर्शी अर्धमूर्त देवता, पारदर्शी देवता, संपूर्ण अपारदर्शी देवता, आणि चिन्हित देवता, यांचाही आपल्या दृष्टीने फारसा उपयोग नाही.

१. मागील संदर्भ पृ. ९
२. हिलेब्रांट् ए. 'वेदिक मायथॉलॉजी' भाग १, १९२७ पृ. ४
३. दि रिलिजन् ऑफ दि वेद, न्यूयॉर्क, १९०८ पृ. ८८

बर्गेन्य[1] या परेंच विचारकाच्या दृष्टीने सूर्याचे स्थान वैदिक देवतामध्ये फार महत्त्वाचे आहे. त्याने देवतांचे वर्गीकरण पारिवारिक संबंधाच्या आधारावर केले असून त्यामध्ये देवतांच्या चांगल्या व वाईट प्रवृत्ति, त्यांची लिंगपद्धती इत्यादी गोष्टींचा पण विचार करण्यात आला आहे. अर्थातच त्यामध्ये सूर्य ही एक अतिशय श्रेष्ठ आणि सुखदायी देवता आहे हे जणू गृहीतकृत्यच आहे. त्यांच्या मते सूर्य आणि सवितृ या देवता एकच आहेत.

एच्. ओल्डनबर्ग यानीपण आपल्या 'दी रिलिगिऑन् डेस् वेद' (बर्लिन १९१७, पृ. ९३) मध्ये वैदिक देवतांच्या वर्गीकरणाचा प्रश्न हाताळलेला आहे. त्यांनी पारिवारिक संबंधावर आधारित वर्गीकरणाची आलोचना करून शेवटी स्थानसिद्धांतावर प्रतिपादित केलेले देवतांचे त्रिविध वर्गीकरणच सर्वोत्कृष्ट असल्याचे मान्य केले आहे. पण असे करीत असता त्यानी स्वर्गस्थ देवतांचे सूर्याशी साम्य दाखविण्याचा प्रयत्न केल्याचे दिसून येत नाही. त्यानी स्वतः आपले देवताविषयक विवेचन हे सहा भागात केलेले आहे. अग्नि; इन्द्र; वरुण; मित्र आणि आदित्य; अश्विन्; रुद्र; आणि बाकीच्या देवता: यामध्ये त्यानी मरुत्, वायू, पर्जन्य, विष्णु, पूषन्, सवितृ, बृहस्पति, उषस्, द्यावापृथिवी, सूर्य आणि चंद्र, पाणी आणि नद्या यांचा समावेश केला आहे. यावरून हे स्पष्ट आहे की त्यांच्या दृष्टीने सूर्य ही फार महत्वाची देवता नाही की जिचे वर्णन स्वतंत्रपणे करण्याची आवश्यकता आहे.[2] आणि त्यांनी तसे स्पष्ट म्हटलेही आहे. "इंद्र, अग्नि आणि वरुण यांच्या तुलनेने सूर्य पुष्कळच मागे पडल्याचे दिसून येते."[3]

ए. बी. कीथ्[4] हे प्रमुखपणे श्रेष्ठ व कनिष्ठ असे देवतांचे वर्गीकरण मान्य करतात. पण त्यामध्ये सूर्य देवतेला फारसे महत्वाचे स्थान नाही.

---

१. बर्गेन्य ए. 'ला रिलिजियों वेदिक्,' १९६३ भा. १ (भाषांतरित इं) पृ. ५–७ परांजपे

२. पहा: गोण्ड जे. 'दी रिलिगिओनेन् इंडियेन्स्' भाग १. स्टुट्गार्ट, १९६० पृ. ९४

३. 'रिलिगिऑन् डेस् वेद,' पृ. २४५.

४. 'दि रिलिजन् अँण्ड् फिलॉसॉफी ऑफ् दि वेद' etc. HOS ३१, १९२५, पृ. ९३

सौरदेवतावर्गही त्यांच्या दृष्टीने फारशी छाप पाडणारा नाही. पण त्यानी सूर्य, सवितृ आणि पूषन् या देवतांचा विचार व वर्णन मात्र एकत्र केले आहे. त्यावरून कदाचित या तीनही त्यांना सौर देवता म्हणून मान्य असाव्यात.

आर्. एन्. दांडेकर यांनीपण आपल्या 'वैदिक देवतांचे अभिनव दर्शन'[1] या ग्रंथात तसेच 'न्यू लाइट् ऑन दि वेदिक गॉड् सवितृ'[2] या लेखात आपले देवतावर्गीकरणविषयक व सूर्यासंबंधीचे विचार प्रस्तुत केले आहेत. त्यांच्यामते सूर्य ही देवता फार महत्वाची मानणे सर्वथा चुकीचे आहे. सूर्य आणि सवितृ यांचा काहीही संबंध नाही. सवितृला सूर्यापेक्षा फार महत्वाची कार्ये पार पाडावी लागतात. हे विचार अगदी अभिनव आहेत पण ऋग्वेदातील ऋचांचा पुनः विचार करता सौरदेवता वर्गाची खरी कल्पना त्यावरून येणे कठिण वाटते.

वरील सर्व मतामतांचा विचार करता हे स्पष्ट होईल की काही विचारकांच्या मते सूर्य ही एक अतिशय श्रेष्ठ देवता आहे. अशा परस्परविरोधी स्थितीत वस्तुस्थितीचा ठाव घेण्यासाठी ऋग्वेदातील ऋचांच्या आधारेच नवीन विचार करण्याशिवाय पर्याय उरत नाही. यावरून सूर्याचे आपले वैशिष्टय काय हे ठरवून त्याप्रमाणे इतर देवतामध्ये सौर कोणती हे ठरविणे सयुक्तिक ठरेल.[3]

या दृष्टिकोणातून विचार करता आपल्याला दिसून येईल की सूर्यदेवतेमध्ये प्रखरपणे हा गुणधर्म तर आहेच आणि इतर अनेक देवतांची वर्णनेपण प्रकाशात्मक देवता म्हणून ऋग्वेदांत आहेत हे खरे आहे; पण म्हणून त्या सर्व देवता सौर आहेत असे कोणी म्हणेल तर ते चुकीचे ठरेल. त्याऐवजी सूर्याच्या जवळजवळ प्रत्येक सूक्तात त्याचे पूर्वेला उगवणे हे ऋग्वेदीय ऋषींनी वैशिष्ठ्यपूर्ण पद्धतीने वर्णित केले आहे. अशारीतीने आपल्याला हे दिसून येईल की सूर्य तर प्रकाशतोच पण तो पूर्वेकडे रोज उगवतो हे त्याचे आपले वैशिष्टय आहे.

---

१. पुणे, १९५१

२. ABORI २०, १९३८–३९

३. प्रस्तुत लेखात सोयीच्या दृष्टीने फक्त स्वर्गस्थ देवतांचाच तौलनिक विचार केलेला आहे.

कात्यायनाच्या सर्वानुक्रमणीनुसार[१] ऋ. १.५०, ११५, १६४, १९१; ४.४० ( फक्त शेवटची ऋचा), ५८ ( हे सूक्त सूर्याप्रमाणे आपोदेवी, गौ किंवा घृत यापैकी कोणाचेहि असू शकते ); ५.४०; ७.६० ( पहिली ऋचा ), ६२ (सूर्याच्या ३ ऋचा ), ६५ (तीन ऋचा); ८.१८, १०१: १०.३९, ८८, १३९, १५८, १७०, १८१, १८९ या सूक्तांना सौरसूक्ते मानले गेल्याचे दिसून येते आणि या सर्व सूक्तात साधारणपणे सूर्याचे हे पूर्वेकडील उदयाचे तंत्र प्रतिपादित करण्यात आले आहे. सूर्याचा पूर्वदिशेशीं घनिष्ठ संबंध असल्याचा भरपूर पुरावा या सूक्तांमधून आपल्याला मिळू शकतो. ऋ. १.५०.५ मध्ये तो देव, मनुष्यजात आणि सारे जग या सर्वांसाठी (सर्वांना प्रकाशमान करण्यासाठी ) पूर्वेला उदित होतो.[२] त्याचे सर्व विश्वाला प्रकाशित करणे ऋ. १.१६४.४४ मध्ये स्पष्ट करण्यात आले आहे. ऋ. ५.४०.६ व ९ या ऋचांमधून सूर्य अंधकार दूर करतो हे प्रमुखपणे सांगण्यात आले आहे. ऋ. ८.१०१.१२ मध्ये सूर्याला देवामधील 'पुरोहित' म्हटले आहे. यामधील पुरस् शब्दाच्या व्युत्पत्तीवरूनही सूर्याचा पूर्वदिशेशी संबंध स्पष्ट होतो. पुरस् हा शब्द मूळ पूर्व शब्दाला पुर् असा आदेश होऊन त्याला अस् असा प्रत्यय लावल्यामुळे तद्धित स्वरूपात झाला असल्याचे व्याकरणात मान्य आहे. पाणिनि सुद्धा त्याचा उल्लेख अष्टाध्यायीत १.४.६७ या सूत्रात करतो. तेव्हा पूर्वेला प्रतिष्ठित म्हणजे पुरोहित हे सूर्याचे विशेषण सर्वदा सार्थच ठरणारे आहे. त्याचे रोजचे उगविणे ऋ. १०.३७.८ मध्ये सूचित करण्यात आले आहे. (प्रतिपश्येम सूर्य)[३]

सूर्याचे हे पूर्वेकडे उगविण्याचे व प्रकाश देण्याचे वैशिष्ट्य आतापर्यंतच्या वैदिक विद्वानांनी व दैवतशास्त्रज्ञांनी तितकेसे आवर्जून प्रतिपादिलेले नाही. आदित्य, अर्यमन् , विष्णु, अश्विन् या सूर्याप्रमाणे प्रकाशाच्या देवता आहेत. पण सूर्याप्रमाणे त्या रोज पूर्वेला प्रत्यक्षपणे वर येताना कधीच दृग्गोचर होत नाहीत. त्यांच्यामुळे पूर्वेकडील पर्वत हे 'उदयाचल' म्हणून प्रसिद्ध होत नाहीत. या गुणाचा आविष्कार कांही अंशाने उषस् या देवते-

---

१. संपादित 'मॅक्डोनल् ए. ए.

२. अशाच अर्थाचा विचार ऋ. १.१९१.८; ७.६२. १ व २; ७-६६.४; १४; १०.३७.२ ( उदेति सूर्यः ) व ३; १०.१५९.१ मध्येपण दिसून येते.

३. पहा ऋ. १०.८८.६ व १०.१५८.५.

मध्ये दिसून येतो. आणि म्हणूनच तिला सूर्याची प्रिया, पत्नी मानले गेले आहे.[1] ही देवता सूर्याप्रमाणेच रोज प्रातःकाळी पूर्वेला आपला प्रकाश पसरविते. सूर्य आणि तिच्यामध्ये फरक एवढाच की सूर्य एक प्रचंड तेजोगोल आहे आणि उषस् ही सूर्य उगवण्यापूर्वीचा पसरणारा प्रकाश आहे. उषेच्या प्रकाशामध्येच सूर्य विराजमान होतो. तो तिच्या मांडीवर आरूढ होतो हे ऋ. ७.६३. ३ वरून स्पष्ट आहे. उषेला यामुळेच सूर्या असे म्हटले आहे. त्यामुळे मूळ सौरदेवता दोनच असाव्यात असे वाटते. सूर्य आणि उषस्.

ऋ. १०.१३९.१ मध्ये सवितृचे वर्णन सूर्यरश्मि असे केले असून तो पूर्वेला उगवतो असेही तेथे म्हटले आहे. यावरून सवितृ ही पण सौरदेवता मानावी असे वाटणे स्वाभाविक आहे. पण सूर्य आणि सवितृ यांच्या गुण-धर्मांचा एकंदर विचार करता सवितृ सूर्यापेक्षा खूपच भिन्न असल्याचे दिसून येते. सूर्याचा दिवसाशी संबंध तर सवितृचा दिवस व रात्र दोहोशी[2]. सवितृ हा वरुणाप्रमाणे अतिव्यापक व सर्वनियन्ता आहे, त्याच्यामुळे सर्व प्राणिजात कार्यपर होतात. सूर्यही आपल्या परीने श्रेष्ठ आहे पण सवितृचे गुणधर्म हे सूर्यापेक्षा अप्रत्यक्ष ( abstract ) आणि विशाल आणि म्हणूनच अनुमेय असे आहेत. काही अंशी सूर्याला सवितृच्या आधिभौतिक गुणांचा आविष्कर्ता मानणे योग्य ठरेल. पण सवितृला सौरदेवता म्हणण्यामध्ये मात्र त्याचे वैदिक देवतांमधील महत्त्व कमी करण्यासारखेच होणार आहे.

अन्य स्वर्गस्थ देवतांमध्ये फक्त पूषन् या देवतेलाच कांही अंशी सौर मानता येण्यासारखे आहे.. त्याच्या मार्गाचे वर्णन 'सूर्याचे किरण' अशा स्वरूपात करण्यात आले आहे. निरुक्त ७.९ मध्ये त्याला सूर्य असे संबोधित करण्यात आले आहे. या दोन्ही प्रमाणावरून पूषन् सौरदेवता म्हणून मानली जाण्यास हरकत नसावी कारण सूर्याबरोबरच त्याचे किरणही वरती येतात हे वेगळे सांगावयास नको.

विष्णु, अश्विन्, आदित्य, वरुण, भग, दक्ष, मित्र, विवस्वत्, द्यौ, अदिति या देवतांचा सूर्य हा प्रमुख म्हणून मानला गेला असला तरी त्यांना सौरदेवता म्हणता येणे कठिण आहे. आपण वर पाहिलेले सूर्याचे वैशिष्ठ्य या

१. ऋ. ७.७५.५

२. ऋ. १.३५.२, ४ त्याच्या 'कृष्णा रजांसि' मधील प्रवासवर्णन या ऋचामधन पहावयास मिळते.

देवतामध्ये कुठेच दिसून येत नाही. काही अंशी यांचे वर्णन प्रकाशप्रधान देवता म्हणून जरी आढळले तरी एकतर त्या सूर्याप्रमाणे चक्षूंना स्पष्ट, तेजस्वी दिसणाऱ्या नाहीत आणि त्यांचा प्रतिदिन पूर्वेला उगवून जगाला प्रकाश देण्याच्या कार्याशी काहीही संबंध नाही. त्यामुळे त्यांना सौर देवता मानणे अनुचित होईल.

उदाहरणार्थ विष्णूला स्वर्दृश् ( ऋ. १.१५५.५ अ ) आणि विभूतद्युम्न ( ऋ. १.१५६.१ ब ) ही विशेषणे वापरून त्याचा प्रकाशाशी संबंध स्पष्ट केला आहे. त्याच्या तीन पावले टाकण्याच्या वैशिष्ठ्याचाही सूर्याच्या उगवणे, डोक्यावर येणे आणि पश्चिमेस मावळणे या स्थितींच्या संदर्भात उल्लेख केला जातो. पण त्याचे तिसरे पाऊल हे सर्वात श्रेष्ठ आणि परमोच्चपदी पडते अशी कल्पना आहे. आणि सूर्याच्या मावळण्यामुळे तर सर्वत्र अंधकार पसरतो. शिवाय सूर्याच्या सूक्तामधून एकदाही त्याच्या या त्रिविध मार्गक्रमणाचा उल्लेख नसावा हे पाहाण्यासारखे आहे. यावरून या दोन्ही देवता परस्परभिन्न असल्या पाहिजेत हे स्पष्ट आहे.

विष्णुप्रमाणे अश्विन् देवता पण तेजाच्या स्वामी आहेत ( ऋ. ८.२२.१४ आणि १०.९३.६ ). त्यांचा रथ सूर्यसदृश आहे (ऋ. ८.८.२). या दोन्ही देवता सूर्याप्रमाणे अंधकारही दूर करतात ( ऋ. ३.३९.३ ). ते सूर्या देवतेचे पतिही आहेत ( ऋ. ४.४३.६; १.११९.५ ) आणि ऋ. १.३४.५; ११६.१७; ११८.५; ६.६३.५ मध्ये ती त्यांच्या रथावर पण आरूढ होत असल्याचे वर्णन पहावयास मिळते. पण एवढे असूनसुद्धा अश्विन् सूर्याप्रमाणे प्रत्यक्ष तेजोमय नाहीत आणि त्यांचा उदयही पूर्वेला मनास प्रत्येक दिवशी जाणवणारा नाही. त्यामुळे त्यांना सौर मानणे कठिण वाटते. विद्वानांमध्ये यामुळेच त्यांच्या स्वरूपाविषयी अनेक वाद आहेत. कोणी त्याना चंद्रसूर्य समजतात ( निरुक्त १२.१ ). तर कोणी त्यांना इंद्र आणि सूर्य ( रोथ ) समजतात. या सर्व दृष्टींनी विचार करता अश्विन् देवता सौर देवता नसाव्यात असा निष्कर्ष निघतो.

सूर्याच्या पूर्वेला उदित होऊन प्रकाश देण्याच्या तत्वाचा आदित्य, मित्र इत्यादि अन्य स्वर्गस्थ देवतामध्ये प्रकर्षाने अभाव असल्यामुळे त्यानाही सौर-देवता मानणे चुकीचे ठरेल.

अशा प्रकारे सूर्य, उषस् आणि काही अंशी पूषन् या देवताच सौर देवता आहेत असे मानावे लागते.

श्री. नी. र. वऱ्हाडपांडे

# सत्तावनचे स्वातंत्र्ययुद्ध आणि त्याचे निन्दक

## : ४ :

१८५७ च्या सुमारास ब्रिटिश सत्तेविरुद्ध जो सार्वत्रिक द्वेष जनतेत पसरला होता त्याचे कारण प्रशासनिक अंदाधुंदी, व लुटारू आर्थिक धोरण व वांशिक-अरेरावी हे होते. पण सर्वापेक्षा अधिक प्रबल कारण धार्मिक होते. "लोकांना भिकेस लावून इंग्रजांचे समाधान झाले नाही. आता त्यांनी आमचा धर्मही हिरावून घेण्याचा चंग बांधला आहे," असे क्रांतिकारकांच्या एका पत्रकात विधान आहे. ईस्ट इण्डिया कंपनीच्या बोर्ड ऑफ् डायरेक्टर्सचा अध्यक्ष मँगल्स याने लोकसभेत उघडच सांगितले की "नियतीने भारतासारख्या खंडप्राय देश आपल्या स्वाधीन केला आहे तो ख्रिस्ताचे निशाण त्याच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत फडकविण्यासाठी साऱ्या भारताचे ख्रिस्तीकरण करण्याच्या प्रयत्नात काही खंड वा ढिलाई पडू देता उपयोगी नाही. आपण यासाठी आपली सारी शक्ति वेचू या."

ज्या इंग्रजी शिक्षणाची महती गळे काढून गाण्याची आज फॅशन पडली आहे तिचा प्रणेता जो मेकॉले याने माझी शिक्षण पद्धति रूढ झाल्यावर दोन तीन पिढ्यात भारतात मूर्तिपूजक राहणार नाही अशी एका पत्रात प्रौढी मारली आहे. ( ऑक्टोबर १८३६ ).

मेकॉलेच्या या उद्देशास अनुसरून सरकारी शाळातून सक्तीने बायबल शिकविण्यात येई व "तुमचा देव कोण ?" "तुमचा त्राता कोण ? वगैरे प्रश्नांना ख्रिस्ती धर्माला संमत अशी उत्तरे मुलांनी द्यावी अशी अपेक्षा असे. सरकारी कार्यालयातून गोरे अधिकारी साऱ्या काळ या कनिष्ठांनी ख्रिस्ती झाले पाहिजे असे बजावीत. श्रीराम व महंमद पैगंबर यांना घाणेरड्या शिव्या देण्यात येत. एखाद्या शिपायाने प्रत्युत्तर दिले तर त्यांची घी-रोटी बंद करण्यात येई. इंग्रजांनी एतद्देशीय राज्येच खालसा केली असे नाही. मंदिरे व मशिदी यांची उत्पन्ने देखील मोठ्या प्रमाणावर जप्त केली. झाशी खालसा केल्यावर तेथील





महालक्ष्मीच्या देवळाचे उत्पन्न देखील जप्त केले व झाशीत सर्रास गोवध सुरू केला. राणीने याविरुद्ध पुष्कळ आक्रोश केला पण त्याचा काही उपयोग झाला नाही. ख्रिस्ती होणाऱ्यांचा वाडवडिलांच्या मालमत्तेवरील हक्क कायम रहावा म्हणून कायद्यात फेरबदल करण्यात आले.

सैन्याचे ख्रिस्तीकरण

क. व्हीलर हा बराकपुर छावणीचा मुख्य होता. तो शिपायामध्ये ख्रिस्ती-धर्मप्रसारक चोपड्या वाटे व धर्मांतराचा आग्रह करणारी प्रवचने देई. अधिक बोटचेप्या शिपायांना बंगल्यावर बोलवून धर्मांतराबद्दल दडपण आणी. धर्मान्तराचा प्रचार करण्याबद्दल त्याला एकदा शिपायांनी आपल्या आळीतून हाकलून दिले होते. ज्या मार्गाने शिपाई कूच करीत त्या मार्गावरील नागरिकात देखील ख्रिस्ती धर्माचा प्रचार करण्यास तो सैनिकांचा उपयोग करी. मे. मॅ. केन्झी नावाचा दुसराही एक अधिकारी अशाच कारवाया करी असा उल्लेख सापडतो. सर थॉमस मनरो नावाच्या इंग्रजाने असे करणे धोक्याचे आहे असा सरकारला इषारा दिला होता. पण तिकडे सरकारने लक्ष दिले नाही.

बंगाल इन्फन्ट्रीचा कमाण्डर लिहितो "गेल्या वीस वर्षापासून सैन्याचे ख्रिस्तीकरण करण्याचे धोरण मी अमलात आणीत आहे. हीदनांचे आत्मे सैतानापासून वाचविणे हे सैनिक अधिकाऱ्यांचे एक कर्तव्यच आहे."

रेव्हरेण्ड केनेडी लिहितो "कितीही संकटे येवोत, आपल्या हातात भारताचे राज्य आहे तोपर्यन्त कन्याकुमारीपासून हिमालयापर्यंत ख्रिस्ती धर्म पसरविण्याचे काम आपण कसोशीने केले पाहिजे. हिंदू व मुसलमान धर्माचा द्वेष नेटिवांच्या मनात रुजेपर्यन्त आपल्या प्रयत्नांना खंड पडता उपयोगी नाही. या कामात आपण आपली सर्व सत्ता पणास लावली पाहिजे."

रेव्हरेण्ड गोपीनाथ नंदी नावाचा एक तत्कालीन ख्रिस्ती लिहितो : "तुरुंगातील कैद्याना मी रोज ख्रिस्ती धर्माचे धडे देत होतो. पटवारी व खेड्यातील हिशेबनीस यांनादेखील ख्रिस्ती धर्माचे पाठ व बायबलच्या प्रती देण्यात येत."

सैन्यामध्ये मिशनरी हे कर्नलच्या हुद्यावर असत. एडमंड नावाच्या एका गृहस्थाने लिहिलेले एक पत्रक साऱ्या देशात वाटण्यात आले. त्यात साऱ्या भारतवासीयांनी आपले धर्म सोडून ख्रिस्ती होण्याचा समय जवळ आला आहे

असे म्हटले होते. इंग्रजांच्या लुटारू सारावसुलीमुळे वारंवार दुष्काळ पडत. दुष्काळात उघड्यावर पडलेल्या मुलांना मिशनरी उचलून नेत व ख्रिस्ती बनवीत. सर सय्यद अहमदांनी याबाबतीत असे म्हटले आहे की असे दुष्काळ पाडून येशूच्या कळपाची भरती करावी हाच सरकारचा उद्देश आहे अशी जनतेची धारणा आहे.

## ठिणगी पडली

जनतेचा रोष असाच धुमसत असता एक घटना घडली. डमडम येथील पलटणीतील एक ब्राह्मण शिपाई लोट्यात पाणी घेऊन जात असता, एका खालच्या जातीच्या माणसाने त्याला पिण्यास पाणी मागितले. तेव्हा तो शिपाई म्हणाला "तुझ्या स्पर्शाने माझा लोटा विटाळेल" यावर तो माणूस हसला व म्हणाला "माझ्या स्पर्शाने तुझा लोटा विटाळतो आणि गोमातेची चर्बी लावलेली काडतुसे तोंडाने तोडताना तू विटाळत नाहीस ना" झाले !! ही वार्ता हा हा म्हणता साऱ्या भारतात पसरली. विनायक कोंडदेव ओकासारख्या लेखकांनी काडतुसांना गाईची व डुकराची चर्बी लावली अशी ही शिपायांची अडाणी समजूत होते व नानासाहेब व लक्ष्मीबाई यांच्यासारख्या समजूतदार लोकांनीदेखील मूर्खपणे त्यावर विश्वास ठेवला असा आरोप केला आहे. पण मजुमदारांसारख्या निंदकांनादेखील चर्बीचा आरोप अक्षरशः सत्य होता हे कबूल करावे लागले आहे. खरे अडाणी शिपायी नसून विनायक कोंडदेव ओकासारखे लोकच होते.

पण एवढे कबूल करून मजुमदार सेन यासारख्या लेखकांची अशी भाबडी समजूत आहे की इंग्रजाकडून केवळ चुकीने असे घडले. अशी पावित्र्यविघातक काडतुसे वाटण्यात त्यांचा काहीही दुष्ट हेतु नव्हता.

बुद्धी गहाण ठेविली म्हणजे नाकासमोरची गोष्ट पाहण्याचे सामर्थ्य देखील कसे नाहीसे होते याचे हे एक उत्कृष्ट उदाहरण आहे. ख्रिस्तीकरणाचा प्रयत्न किती मोठ्या प्रमाणावर सैन्यातदेखील सुरू होता याचे सेनांनी स्वतःच वर्णन केले आहे. ईस्ट इंडिया कंपनीच्या डायरेक्टरने आपल्या सत्तेचा उपयोग आपण भारताचे ख्रिस्तीकरण करण्यासाठी केला पाहिजे असे उघडच म्हटल्याचे मजुमदारांना माहीत नसणे संभवनीय नाही. शिवाय काड-तुसाबद्दल आपला असंतोष शिपायानी सत्तावनच्या बऱ्याच आधीपासून व्यक्त करायला सुरवात केली होती. शिपायांच्या तक्रारीत तथ्य आहे असे काही

अनुक्रमणिका

ब्रिटिश अधिकाऱ्यानी देखील सांगितले होते. पण तरीही तक्रारी दूर करण्यात आल्या नाहीत.

चर्बीची काडतुसे वापरण्यात पुढील धोरणे दिसतात: (अ) बराच काळपर्यंत काडतुसाचे स्वरूप गुप्त ठेवणे; (ब) बराच काळ गेल्यावर आपण दिवसानुदिवस गायीची व डुकराची चर्बी तोंडात घातली व धर्मभ्रष्ट झालो हे शिपायांना कळू देणे. शिपायांना हे कळलेच तर त्यांना धर्मभ्रष्ट करण्याच्या दृष्टीने काडतुसांचा कांहीच उपयोग नव्हता. (क) शिपायांना धर्मभ्रंशाचा धक्का बसल्यावर देखील "मायबाप सरकारचा यात काही दुष्ट हेतु नव्हता, ही केवळ चूक झाली अशी मजुमदार आणि कंपनीप्रमाणे शिपायांची श्रद्धा कायम ठेवणे.

ही धोरणे साधली तर शिपायांचा रोष सरकारकडे वळणार नाही व ते बऱ्याबोलाने ख्रिस्ती होतील असा सरकारचा कयास होता.

म्हणूनच काडतुसाबद्दल तक्रारी आल्यावर सरकारने सरळ याची कबुली दिली नाही वा ही गोष्ट सरळ नाकबूलही केली नाही. उलट काडतुसें बदलण्यात येत आहेत असे खोटेच सांगून तीच काडतुसे चालू ठेवली.

शिपाई अत्यंत मूर्ख आहेत अशी इंग्रजांची समजूत होती. बण्डाचा डोंब उसळल्यावर देखील "शिपायांच्या वर्तनाचा अन्वय लावीत बसणे व्यर्थ आहे. वर्तनाला अन्वयार्थ असण्याइतकी अक्कल शिपायात आहे तरी कोठे?" असे एका इंग्रजाने उद्‌गार काढले होते. अर्थात् काडतुसांच्या प्रकरणामुळे शिपायास आपल्या हेतूबद्दल संशय येऊन ते क्रुद्ध होतील असे इंग्रजास वाटले नाही. अभावितपणे घडलेल्या चुकीमुळे आपण बाटलो आता बऱ्या बोलाने ख्रिस्ती व्हावे अशीच शिपायांची प्रतिक्रिया इंग्रजांनी अपेक्षिली होती.

## स्वधर्म आणि स्वदेश

पण शिपाई मजुमदार आणि कंपनीपेक्षा अधिक शहाणे व स्वाभिमानी होते. त्यांनी धर्मरक्षणासाठी शस्त्र उपसले. सत्तावनचा उठाव शिपायांनी केला असला तरी तो आपल्या धर्माच्या रक्षणासाठी केला, पगारवाढ वगैरेसारख्या व्यावसायिक तक्रारीसाठी केला नाही. हिंदू व मुस्लिम धर्म ही काही शिपायांची मिरास नव्हती. अखिल भारताचाच समावेश या धर्मात होत होता. म्हणजे ज्या तत्वासाठी हा लढा झाला ते अखिल भारतीयांना प्रिय असलेले

तत्व होते, केवळ शिपायांना प्रिय असलेले तत्व नव्हते. म्हणून शिपायांचा लढा हा साऱ्या राष्ट्राचा लढा होता.

शिपायाप्रमाणेच त्यांचे पुढारीही धर्मासाठी लढले. नानासाहेब पेशवे म्हणतात "इंग्रज लोकांनी आजपर्यंत फसवाफसवीच्या मार्गाने भारतीयांना धर्मभ्रष्ट करण्याचा प्रयत्न केला. फसवाफसवीने काम साधत नाही असे पाहून आता त्यांनी या कामासाठी बलप्रयोग करण्यास सुरवात केली आहे. इंग्रजांची अरेरावी, दुष्टावा व अन्याय इतका वाढत गेला की त्यांना शासन करण्यासाठी भारतात हिंदू व मुसलमान राज्ये स्थापन करण्यास ईश्वराने माझी योजना केली आहे."

राणी लक्ष्मीबाई विष्णुभट गोडसेला म्हणाली "मी अर्धा शेर तांदुळाची धनीण. मजला . . . विधवाधर्म सोडून हा उद्योग करण्याची जरूर नव्हती. परंतु हिंदुधर्माचा अभिमान धरून या कर्मास प्रवृत्त झाले, व याजकरिता वित्ताची, जीविताची सर्वांची आशा सोडली.'

सारांश सत्तावनचे युद्ध हे धर्मरक्षणाचे युद्ध होते.

मजुमदारप्रभृतीचे म्हणणे असे की धर्मासाठी लढणे म्हणजे देशासाठी लढणे नव्हे. देश, राष्ट्र वगैरे कल्पना इंग्रजी शिक्षणाने निर्माण केल्या.

ब्रिटिशपूर्व भारतीय नेत्यांचे विचार समजून घेण्यास फारच थोडी सामग्री उपलब्ध आहे. पण जी आहे त्यात राष्ट्र, देश, मातृभूमी वगैरे शब्द आढळतच नाहीत, निदान आजच्या इतक्या प्रचुरतेने आढळत नाहीत, हे खरे आहे. पण राष्ट्र व मातृभूमी या शब्दात अशा कोणत्या लोकोत्तर व धर्मात समाविष्ट नसलेल्या कल्पना आहेत की ज्यांच्यापुढे राणी लक्ष्मीबाईचा हिंदु धर्माभिमान हिणकस वाटावा ? हिंदु धर्माचा अभिमान बाळगणाऱ्यांच्या मनात भगवान् शंकराने पुनीत केलेला हिमालय, भगीरथाने स्वर्गातून आणलेली गंगा, कृष्णाच्या मुरलीचे स्वर जेथे अजून घुमत आहेत अशी यमुना, अगस्तीपुढे नम्र झालेला विंध्य, रामाच्या सेतुबंधाची साक्ष देणारे रामेश्वर यांच्याबद्दल पावित्र्य भावना नसेल हे शक्य आहे काय ? मातृभूमीचा अभिमान तो आणखी काय असतो ? उलट मातृभूमी या शब्दात माझा या भूमीवर जन्म झाला ही केवळ वैयक्तिक घटना सूचित होते. उलट धर्मभूमीच्या कल्पनेत आपली सारी संस्कृती इथे जन्मली व वाढली ही अधिक व्यापक भावना व्यक्त होते. धर्म म्हणजे उपासनापद्धती वा पूजाविधी एवढाच संकुचित अर्थ केला तर धर्माभिमान हे राष्ट्राभिमानाचे स्वरूप आहे असे म्हणता

येणार नाही. पण धर्म या शब्दाची व्याप्ती एवढी संकुचित कधीच नव्हती. "धारणाद्धर्म इत्याहुः।" म्हणजे समाजाचे धारण करणाऱ्या सर्वच गोष्टी धर्मात समाविष्ट होतात. ज्याने निःश्रेयसाबरोबरच अभ्युदय देखील साधतो तो धर्म असे कणादाने म्हटले आहे. अर्थात हिंदुधर्म या शब्दात हिंदूची राज्यव्यवस्था, चालीरीति, ज्ञानविज्ञान, कलाकौशल्य, भाषा, साहित्य, या सर्व परंपराचा समावेश आहे तो. अर्थात धर्माभिमान ही भावना देशाभिमानाच्या केवळ भौगोलिक भावनेपेक्षा कोणत्याही अर्थाने कमी व्यापक नाही.

## सारेच फसले नाही

हिन्दुधर्माभिमान हा भारतीय राष्ट्राभिमानापेक्षा कमी व्यापक आहे. कारण भारतात हिंदू व मुसलमान या दोघांचाही समावेश होतो असे यावर म्हणण्यात येईल, हिंदू व मुसलमान भारत नावाच्या एकाच भूभागात राहतात या व्यतिरिक्त त्यांना एका राष्ट्राचे घटक मानता येईल असे कोणते दुवे आहेत याचे निःसंदिग्ध व सर्वमान्य उत्तर आजच्या भारतीयांना देखील देता येत नाही. तेव्हा सत्तावनच्या संबंधात या प्रश्नाची चर्चा करण्यात अर्थ नाही. पण सत्तावनच्या संग्रामात भारतीय हिंदू व मुसलमान यांच्यात जेवढी एकवाक्यता दिसली तेवढी पुढे केव्हाही दिसली नाही यावरून हिंदू मुसलमानांच्या संयुक्त राष्ट्रीयत्वाच्या ध्येयाची कसोटी लावली तरी सत्तावनच्या संग्रामाची सर पुढच्या कोणत्याही चळवळीला येत नाही.

सत्तावनचे युद्ध हिंदू व मुसलमान धर्मांच्या रक्षणासाठी झाले यावरून या युद्धाच्या मागे तात्त्विक भूमिका नव्हती हा प्रथितयश कादंबरीकार श्री. माडखोलकर यांचा आक्षेप निरर्थक ठरतो. युद्धाच्या मागे तात्त्विक भूमिका नव्हती या म्हणण्याचा अर्थ हिंदू व मुसलमान या धर्मांना तात्त्विक भूमिका नाही असा होतो. सत्तावनचे निन्दक किती अर्थशून्य विधाने करतात याचे हे एक उदाहरण आहे.

स्वातंत्र्ययुद्ध फसले हे खरे आहे, पण धर्मरक्षण हा त्याचा एक उद्देश लक्षात घेता ते सर्वस्वी फसले नाही असे म्हटले पाहिजे, कारण सत्तावननंतर भारतीयांच्या धर्मात ढवळाढवळ करणार नाही अशा स्वरूपाचे वचन व्हिक्टोरिया राणीने आपल्या जाहिरनाम्यात ग्रथित केले व भारताचे ख्रिस्तीकरण करण्याचा प्रयत्न इंग्रज सरकारने कायमचा सोडून दिला.

अनुक्रमणिका

## गोपूजेचे तत्त्वज्ञान

सत्तावनच्या धर्मयुद्धाबद्दल आदर कमी करण्यासाठी कधी कधी असे प्रतिपादन करण्यात येते की ज्या धर्माचे रक्षण स्वातंत्र्ययोद्ध्यांना अभिप्रेत होते, त्याचे स्वरूप गोमांसाचा विटाळ या अंधश्रद्धेच्या स्वरूपाचे होते. तेव्हा अशा युद्धाबद्दल आपण अभिमान का बाळगावा ?

हा प्रश्न विचारणाऱ्यांना अंधश्रद्धा म्हणजे काय हे कळत नाही हे स्पष्ट आहे. अनेक तऱ्हेने उपयोगी पडणाऱ्या गायीसारख्या पशूबद्दल कृतज्ञता ही एक उदात्त भावना आहे. हिंदू समाजाला ही भावना लांछनास्पद नसून भूषणास्पद आहे.

गोपूजेची भावना नैतिक दृष्ट्या मोठी उदात्त असेल पण ज्या हिंदू समाजाला माणसांना पोसण्याची देखील ऐपत नाही त्याने निरुपयोगी गायींना पोसण्याची उठाठेव करणे हा शुद्ध मूर्खपणा आहे, अशा मूर्खपणास उत्तेजन देणाऱ्या प्रवृत्ति निंद्य मानल्या पाहिजेत असे एक " पुरोगामी " मत प्रचलित आहे.

पुष्कळशा पुरोगामी मताप्रमाणेच हेही मत संबंधित तथ्यांच्या अज्ञानावर आधारलेले आहे. गोमांस खाणारे, दूध न देणाऱ्या म्हाताऱ्या व निरुपयोगी गायीचेच मांस खातात अशी या 'पुरोगाम्यां'ची समजूत आहे. वस्तुतः निरुपयोगी गायीचे मांस देखील खाण्यास निरुपयोगी असते. गोमांसाला चटावलेले लोक दुभत्या तरुण गायी व त्यापेक्षाही खुसखुशीत मांसासाठी वासरे देखील मारतात. यदृच्छया जन्मास आलेल्या गाईच मारल्या जातात असे नाही. मांसासाठी गायींची उपज मुद्दाम वाढविण्यात येते. दूध दुभते व बैल यांच्यासाठी जेवढ्या गायी लागतात त्याच्यापेक्षा अनेकपटींनी जास्त मांसासाठी लागतात. कारण गायी व बैल ही जगली तर साधारणपणे १० वर्षे उपयुक्त असतात. १० वर्षात एक गाय जेवढे दूध, मूत्र व शेण देते व बैल जेवढ्या किमतीची मजुरी करतो तेवढे त्यांना एका झटक्यात मारून मिळणाऱ्या त्यांच्या मांसाचे पोषणमूल्य नसते. सारांश गोमांसभक्षण हा अत्यन्त श्रीमन्त राष्ट्राचा चोजला आहे. अन्नसमस्या सोडविण्यासाठी गोमांसभक्षण करावे असे म्हणणारे लोक "भाकर मिळत नाही तर पुरणपोळी खा" असा उपदेश करणाऱ्या मेरी अँण्टायनेटच्या जातीचे आहेत.

म्हातारपणी गाय दूध देईनाशी होते व बैल थकतो तेव्हादेखील हे प्राणी अगदीच निरुपयोगी होत नाहीत. या प्राण्यांचे मलमूत्र देखील उपयोगी

असते. इन्धन या दृष्टीने १० टन शेणाचे मूल्य १ टन कोळसा व दोन टन लाकूड यांच्याबरोबर असते. गोमयाचे मूल्य खत म्हणून यापेक्षाही अधिक आहे. या मूल्यातून म्हाताऱ्या गायीबैलांना पोसण्याचा खर्च पूर्णपणे न निघाला तरी या प्राण्यांच्या साऱ्या जन्मातील उपयुक्ततेच्या मानाने तो अगदीच क्षुद्र आहे.

हिन्दूच्या गोपूजेला आर्थिक दृष्टया आत्मघातकी म्हणून हसणारे गोरे लोक गायीच्या मानाने ज्याची उपयुक्तता शून्य आहे अशी कुत्री पाळण्यात मात्र शतपटीने अधिक खर्च करतात. कुत्र्याचे अन्न विकणारी खास दुकाने पाश्चात्य देशात असतात. इंग्लंडमध्ये तीन घरामागे एक कुत्रा असतो असे मानले तरी कुत्र्यांची संख्या कोटीच्या जवळपास असली पाहिजे. कोटयवधि निरुपयोगी कुत्री पाळणारे इंग्रज सुधारलेले, व गायीसारख्या उपयुक्त पशूबद्दल कृतज्ञता बाळगणारा हिन्दू मात्र अडाणी ! आणि या न्यायाला म्हणावे बुद्धिवाद !!

शिपायांचा गोमांसभक्षणाला विरोध होता पण हा विरोध गायीबद्दल पूज्यता व्यक्त करणारा आहे, अजाणता वा स्वधर्मासाठी लढण्यास आवश्यक म्हणून गोमांस तोंडात घातले तर तेवढयाने धर्म बुडत नाही एवढा विवेक शिपायांना होता. आपला धर्म बुडवू पाहणाऱ्याविरुद्ध जेव्हा त्यांनी शस्त्र उपसले तेव्हा ज्या अपवित्र काडतुसांनी त्यांचा धर्म बुडविण्याचे कारस्थान शत्रूने रचले होते ती काडतुसे वापरून त्यांनी शत्रूवर गोळयांचा वर्षाव केला. शिपायांचा राग काडतुसे वाटण्यासारख्या एकट दुकट कृत्यावर नसून आपल्या धर्माला शत्रुस्थानी लेखणाऱ्या परसत्तेवर होता.

## सतीचा कायदा

परकीय सत्तेबद्दल सहानुभूति व स्वातंत्र्ययुद्धाबद्दल अनादर निर्माण करण्यासाठी कधी कधी असे म्हणण्यात येते की स्वातंत्र्ययोद्धे ज्या धर्माचे रक्षण करू पहात होते त्यात सतीच्या अमानुष चालीचा अंतर्भाव होत होता. कनवाळू इंग्रजांनी ज्या चालीवर बंदी घातली होती ती त्यांना पुनः सुरू करायची होती. स्वातंत्र्ययुद्धाच्या विरुद्ध काही बोलता येण्यासारखे उरू न देण्याचा ज्यानी चंग बांधला आहे अशा मजुमदारासारख्या लेखकांनी " सतीच्या चालीवर बंदी उठवा " अशी स्वातंत्र्ययोद्धयांनी कोणत्याही पत्रकात वा भाषणात मागणी केल्याचे दाखवून देता आले नाही. उलट या युद्धाची एक प्रमुख स्फूर्तिदेवता

अनुक्रमणिका

राणी लक्ष्मीबाई ही स्वतः विधवा होती, ती सती गेली नाही एवढेच नव्हे तर तिने केशवपन देखील केले नाही. या अमर्यादेबद्दल तिने एक क्षुद्र प्रायश्चित्त घेतले व तेवढ्याने तत्कालीन समाजाचे समाधान झाले. तिच्या प्रजाजनांना तिच्याबद्दल वाटणाऱ्या आदरात या असनातनी वागणुकीने काहीही फरक पडला नाही.

दुसरे असे की इंग्रजांनी सतीबंदीचा कायदा केला त्यालादेखील राजा राम मोहन रायासारख्या भारतीय सुधारकांचे प्रयत्नच कारणीभूत झाले. इंग्रजांच्या पूर्वीदेखील सती जाण्यासाठी कुणावर दडपण आणणे हा पेशव्यांनी गुन्हा ठरविला होता. पेशव्यांच्याही पूर्वी अकबराने सतीवर बंदी घातली होती त्यासाठी अकबराविरुद्ध लोकमत खवळल्याचा कुठे उल्लेख सापडत नाही. सतीची चाल वरिष्ठ मानलेल्या जातीतच फक्त होती. व या जातीत देखील सती गेल्याची उदाहरणे तुरळकच आहेत. पेशव्यांच्या घराण्यात रमाबाईखेरीज कुणी सती गेल्याचा उल्लेख नाही. बहुसंख्य समाजाला सतीबंदी विरुद्ध बंड करून उठण्याइतके सतीच्या चालीचे महत्व कधी वाटले नाही तेव्हा सत्तावनच्या संग्रामाच्या कारणात सतीबंदीचा उल्लेख हेतुपुरःसर केलेल्या दुष्ट प्रचाराच्या स्वरूपाचा आहे.

नानासाहेब पेशव्यांनी मुक्त केलेल्या प्रदेशावर आपली राज्यव्यवस्था सुरू केली ती पुष्कळशाबाबतीत परंपरागत हिंदू कायद्याप्रमाणे होती. तरी त्यांनी सतीबंदी उठविल्याचा दाखला सापडत नाही. फौजदारी गुन्ह्याबद्दल आज क्रूर वाटणाऱ्या काही शिक्षा त्यांनी दिल्याचा उल्लेख आहे. यावर सेनांनी पेशवाईची पुनः स्थापना म्हणजे पुच्छप्रगती ठरली असती असा ध्वनी काढला आहे. दण्डविधान कडक असावे की सौम्य असावे हा चर्चेचा विषय आहे. पण कडक दण्डविधान अनिष्ट असे मानले तरी ते सौम्य करण्यासाठी आम्हाला परसत्तेची जरूर वाटावी हे बुद्धीचे दिवाळे वाजल्याचे लक्षण आहे. जहाजांच्या कप्तानाने जहाजाबरोबर समुद्राच्या तळाशी गेले पाहिजे अशी पाश्चात्य देशात परंपरा आहे. ही परंपरा सतीच्या चालीसारखीच अमानुष आहे. या परंपरेवर बंदी पडावी म्हणून तुम्ही आपला देश जपानी वा चीनी यांच्या स्वाधीन करा असे इंग्रजांना कोणी म्हटले तर तो असा सल्ला देणाऱ्याचे कसे स्वागत करील ?

अनुक्रमणिका

डॉ. के. वा. आपटे

# भगवद्गीता : मोक्षमार्गांचे विवेचन : २

## पातंजल योगाच्या धर्तीचा योग

योगाचा अभ्यास फार पुरातन काळापासून भारतवर्षात प्रचलित होता[1]. कठ, श्वेताश्वतर, इत्यादीसारख्या प्राचीन उपनिषदांतून यौगिक आचार अंगांचे उल्लेख[2] आढळतात. योगतत्त्व, योगचूडामणि, इत्यादीसारख्या उत्तरकालीन योग उपनिषदात तर योगाच्या अंगांचे विस्तृत विवेचन येते. पतंजलिमुनीचे योगसूत्र हा योगावरचा दार्शनिक आणि प्रमाणभूत ग्रंथ मानला जातो. यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा व समाधि अशी आठ योगाची अंगे पतंजलि सांगतो.

भगवद्गीतेने सांगितलेला योग हा पातंजल योगाच्या धर्तीचा आहे. असे म्हणण्याचे कारण एवढेच की पातंजल योगातल्या आठही अंगांचा स्पष्ट शब्दात निर्देश भगवद्गीतेत दिसत नाही. तथापि अभिप्रायरूपाने भगवद्गीतेने या आठ अंगांचा उल्लेख केलेला आहे, हे पुढील विवेचनावरून स्पष्ट होईल :— विविध यज्ञ- सांगताना भगवद्गीता योगयज्ञाचा ( ४. २८ ) निर्देश करते. चित्ताचे नियमन करण्यास भगवद्गीतेने जे अभ्यास आणि वैराग्य हे दोन उपाय सांगितलेले आहेत ( अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येण च गृह्यते । ६. ३५ ), ते पातंजलयोगदर्शनात त्याच कारणासाठी सांगितलेले सापडतात ( अभ्यास-वैराग्याभ्यां तन्निरोधः । यो. सू., समाधिपाद, १२ ). योगाने सांगितलेल्या अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह या यमांपैकी ( यो. सू., साधन-पाद, ३० ) अस्तेय सोडून इतर भगवद्गीतेत आढळतात (पण यम हा शब्द वापरून मात्र भ. गी. त्यांचा निर्देश करीत नाही, हे लक्षात घ्यावे ) :— दैवी संपद् सांगताना ( १६.२ ) अहिंसा व सत्य येतात; ब्रह्मचारिव्रताचा

१. जैन आणि बौद्ध दर्शनातही यौगिक अभ्यास या ना त्या स्वरूपात आढळतोच. बौद्धांचा एक संप्रदाय तर 'योगाचार' या नावानेच प्रसिद्ध आहे.

निर्देश योगाच्या विवेचनात (६.१४) येतो; ब्रह्मभूताच्या वर्णनात (१८.५३) व योगाच्या वर्णनात (६.१०) अपरिग्रह आलेला आहे. योगामधील शौच, संतोष, तप, स्वाध्याय व ईश्वरप्रणिधान (यो. सू. साधनपाद, ३२) या नियमांपैकी पुढे दिलेल्यांचा उल्लेख भगवद्गीतेत आहे. (पण नियम हा शब्द वापरून मात्र हा उल्लेख येत नाही) :– दैवी संपदमध्ये (१६.१,३) शौच, तप व स्वाध्याय आहेत; संतोषाचा उल्लेख भक्ताच्या वर्णनात येतो (१२.१४); व योगाचे विवेचनात (६.१४) ईश्वरप्रणिधान येऊन जाते. आसनाचा[२] उल्लेख योगाच्या विवरणात (६.११) दिसून येतो. प्राणायामाचा[३] उल्लेख पुढीलप्रमाणे आढळतो :– अपरे नियताहारा: प्राणान् प्राणेषु जुह्वति (४.३०); येथे प्राणात प्राणाचे अर्पण करण्याच्या प्रक्रियेचा बोध होतो. अपाने जुह्वति.... प्राणायामपरायणा: (४.२९) मध्ये प्राणायाम शब्दाचा वापर असून, ज्ञानी माणसाच्या वर्णनात, 'प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यन्तरचारिणौ' (५.२७) या स्वरूपात प्राणायामाचे स्पष्टीकरण सापडते. स्थितप्रज्ञाच्या वर्णनातील, 'यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वश: । इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्य:' (२.५८) या श्लोकात, तसेच योगवर्णनातील 'यतो यतो.... वशं नयेत्' (६.२६) या श्लोकात प्रत्याहाराचा बोध होतो, असे म्हणता येईल. 'तत्रैकाग्रं मन: कृत्वा'... (६.१२) मध्ये धारणेचे सूचन होते; असे म्हणता येईल. 'मन: संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्पर:' (६.१४) मध्ये ध्यानाचा उल्लेख आहे, असे म्हणण्यात अडचण नाही. आणि 'युञ्जन्नेवं .... गच्छति' (६.१५) या श्लोकात समाधीची सूचना आहे, असे म्हणता येते. हे कसेही असो, एक गोष्ट खरी की भगवद्गीता मनाच्या एकाग्रतेवर (६.१९, २५) भर देते.

भगवद्गीतेतील योगाचे वर्णन प्रामुख्याने सहाव्या अध्यायात, व इतर काही ठिकाणी आढळते. त्याचा तपशील पुढीलप्रमाणे देता येईल.

### योगाभ्यासाचा अधिकारी

कुणीही उठून मी योगाचा आचार करीन असे म्हणेल तर ते शक्य नाही. वाटेल त्या सोम्यागोम्याला योगाचा अभ्यास जमणार नाही. योगाभ्यास करणाऱ्याने काही गोष्टी मितपणे आणि नियमितपणे केल्या पाहिजेत. अति-

---

२. 'स्थिरसुखमासनम्' (यो. सू. साधनपाद, ४६) या स्वरूपाचा उल्लेख मात्र भगवद्गीतेत येत नाही.

३. श्वासप्रश्वासयोर्गतिविच्छेद: प्राणायाम: । यो. सू., साधन पाद, ४९

भोजन करणारा, अति उपवास करणारा, अति निद्रा घेणारा व अति जागरण करणारा माणूस योगाभ्यासाला योग्य नाही ( नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकान्तमनश्नतः । न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ॥ ६.१६ ). तसेच, ज्या कोणाला मनाचे संयमन करणे जमत नाही, त्या प्राण्यालाही योग साधणे अवघड आहे ( असंयतात्मना योगो दुष्प्राप इति मे मतिः । ६.३६ ). तर नियमित आणि युक्त असा आहार, विहार, चेष्टा, कर्म, निद्रा व जागरण करणाऱ्याला योग साधून, त्याच्या दुखाचा[४] नाश होतो. ज्याला स्वतःचे मन वश करणे शक्य आहे, अशा साधकाला योग्य उपायांनी योग साधता येणे शक्य आहे ( वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः । ६.३६ ).

आणखी असे:– योगाच्या अभ्यासात चित्ताची निश्चलता आणि एकाग्रता होणे, हे अत्यंत महत्त्वाचे आहे. पण मन तर अत्यंत 'अचपळ' आहे. वायूची मोट बांधण्याप्रमाणे मनाचा निग्रह करणे दुष्कर आहे ( ६.३४ ). मग मनाची चंचलता मोडून, चित्ताला निश्चलता प्राप्त होऊन, योगाभ्यास कसा साधणार ? भगवद्गीता सांगते की मन अत्यंत चंचल आहे हे खरे. पण अभ्यास आणि वैराग्य यांचेयोगे मनाचा संयम करणे शक्य होते ( ६.३५ ).

### योगाभ्यास –

योगाभ्यास कसा करावा हे भगवद्गीता पुढीलप्रमाणे सांगते :– १) स्थान- योगाभ्यासाला एकान्त स्थान आवश्यक आहे. जेथे इतरांच्यामुळे योगसाधकाचे मन विचलित होणार नाही, असे स्थान योगाभ्यासास लागते. इतकेच नव्हे तर एकान्तस्थानात एकट्यानेच रहाण्याचा अभ्यासही आवश्यक आहे. एकान्त बाणला पाहिजे. कारण एकान्तात रहाणे हे वाटते तितके सोपे नाही. माणूस हा सामाजिक प्राणी आहे. त्याला एकट्याने रहाण्याची सवय जडवून घ्यावयास हवी; नाहीतर एकान्त खायला उठतो; आणि मन अधिकच भरकटत जाण्याचा संभव असतो. भगवद्गीता सांगते एकान्त स्थान निवडून, योग्याने एकाकी, इच्छारहित आणि अपरिग्रह असावे आणि सतत मनाचा संयम करण्याचा प्रयत्न करावा ( योगी युञ्जीत सततमात्मानं रहसि स्थितः । एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः ॥ ६.१० ) २) आसन- निवडलेल्या शुद्ध स्थानात, फार उंच व खोल नसणाऱ्या जागेवर, चैलाजिनासनावर दर्भ पसरून आसन स्थिर ठेवावे.

४. युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।
युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥ ६.१७

अनुक्रमणिका

त्या आसनावर बसून, चित्त, इंद्रिये व क्रिया यांचे नियमन करून, आणि मन एकाग्र करून, चित्तशुद्धीसाठी योग आचरावा. आसनावर स्वतः स्थिर राहून, देह, मस्तक आणि मान एका सरळ रेषेत धारण करावेत; आणि इकडे तिकडे दिशांकडे न पहाता, स्वतःच्या नासिकाग्राकडे पहावे ( ६.११-१३ ) ( नासिकाग्राकडे पहाण्याच्या अभ्यासाने मन लौकर स्थिर होते ).

मनाचे स्वरूप संकल्पविकल्पात्मक आहे. ( संकल्पविकल्पात्मकं मनः । ). संकल्पाअंती मनात नाना कामांचा प्रादुर्भाव होतो. भगवद्गीता सांगते – संकल्पामुळे उत्पन्न होणाऱ्या सर्व कामांचा संपूर्ण त्याग करून, सर्व प्रकारे मनाने इंद्रियसमूहाचे नियमन करून, धैर्याने स्थिर केलेल्या बुद्धीच्या साहाय्याने (बाह्य विषयांतून) परावृत्त व्हावे, आणि आत्म्याचे ठिकाणी मन स्थिर करून, इतर कसलाही विचार करू नये (६.२४–२५ ). आणि जर चंचल व अस्थिर मन पुनः पुनः विचलित होत असेल तर त्याचे पुनः पुनः नियमन करून त्याला पुनः पुनः आत्म्याचे ठिकाणी स्थिर करावे ( यतो यतो निश्चरती मनश्चञ्चलमस्थिरम् । ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ॥ ६.२६ ). आणि जेव्हा मन स्थिर रहाते, तेव्हा चित्त नियंत्रित करणाऱ्या योगाभ्यासूचे मन निर्वात स्थळीच्या दीपाप्रमाणे स्थिर आहे, अशी उपमा देता येते ( ६.१९ ).

ब्रह्मचर्य पाळून, भयरहित आणि शांतचित्त अशा योगाच्या अभ्यासकाने मनाचा संयम करून, चित्त ईश्वराच्या ठिकाणी लावून, ईश्वरपर असावे.

योगाच्या अभ्यासात एकाग्र मनाने ध्यान करणे हेही महत्त्वाचे आहे. इतकेच नव्हे तर ज्ञानापेक्षा ध्यान श्रेष्ठ आहे ( ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते । १२. १२ ). आणि काही प्रयत्नशील योगी स्वतःमध्येच अवस्थित असलेल्या आत्म्याला पहातात ( यतन्तो योगिनश्चैनं पश्यन्त्यात्मन्यवस्थितम् । १५.११ ). काही योगी ध्यानाने आत्म्याला पहातात (ध्यानेनात्मनि पश्यन्ति केचिदात्मानमात्मना । १३. २४ ).

---

५. प्रशान्तात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थितः। मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः ॥ ६.१४. - अशा योग्याला ईश्वराचे ठिकाणी लयरूप श्रेष्ठ शांति प्राप्त होते. ( ६.१५ )

नियंत्रित केलेले मन जेव्हा आत्म्यात स्थिर होते, तेव्हा सर्व कामांचे ठिकाणी निस्पृह असणाऱ्या त्या माणसाला योगी असे म्हटले[६] जाते (६. १८).

योगाभ्यासाने नियंत्रित केलेले चित्त स्थिर होते आणि योगी स्वतःमध्ये आत्म्याला पहात संतुष्ट होतो. ते आत्यंतिक सुख अतीन्द्रिय असले तरी बुद्धि-ग्राह्य आहे; आणि ते प्राप्त झाल्यावर योगी तत्त्वापासून चलित होत नाही (६. २०–२१). हा लाभ हाती आल्यावर, त्याला दुसरा कोणताही लाभ श्रेष्ठ वाटत नाही; महादुःखाने सुद्धा त्याची चलबिचल होत नाही ( यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः । यस्मिन् स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते ॥ ६. २२). शांत मन झालेल्या त्या योग्याला, रजोगुणरहित, पाप-रहित व ब्रह्मभूत असे उत्तम सुख प्राप्त होते. योगाचा नित्य अभ्यास करणारा निष्पाप असा योगी ब्रह्म संस्पर्शाने युक्त असे आत्यंतिक सुख[७] लीलया प्राप्त करून घेतो.

अशाप्रकारे हा योग दुःखसंयोग दूर करणारा आहे. म्हणून मन उद्विग्न होऊ न देता, या योगाचा निश्चयपूर्वक अभ्यास करावा ( ६.२३ ).

भगवद्गीता पुढे सांगते– मृत्युसमयीसुद्धा जर ईश्वराचे अथवा (परम) पुरुषाचे चिंतन किंवा ध्यान राहिले तर तो योगी मोक्षाला जातो. चित्त विचलित होऊ न देता, ( ईश्वरचिंतन ) करणारा योगी दिव्य, परम पुरुषाप्रत जातो. प्रयाणकाळी अचल मनाने, भक्तीने आणि योगबळाने जो योगी भ्रूमध्यात प्राणधारण करतो, तो दिव्य अशा परम पुरुषाप्रत जातो. सर्व इंद्रियरूपी द्वारे बंद करून, मनाचे हृदयात नियमन करून, योग– धारणेच्या आधाराने स्वतःचा

---

६. ज्याला योग साधला आहे, तो सर्वत्र समदृष्टि असतो. तो स्वतःचे ठायी सर्व भूते व सर्व भूतांत स्वतःला पहातो ( ६.२९ ). एकत्वाचा आश्रय करून जो योगी सर्व भूतांत असणाऱ्या ईश्वराची भक्ति करतो, तो सर्वप्रकारे ईश्वराच्या ठिकाणीच असतो ( ६.३१) आत्मौपम्याने सर्वत्र पहाणारा तो योगी समदर्शन असतो. (६.३२)

७. प्रशान्तमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् । उपैति शान्तरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥ युञ्जन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मषः । सुखेन ब्रह्मसं-स्पर्शमत्यन्तं सुखमश्नुते ॥ ६.२७.२८.

प्राण मस्तकात आणून, ॐ या एकाक्षर ब्रह्माचा उच्चार करीत व ईश्वराचे स्मरण करीत जो देहत्याग करतो, तो योगी[८] परमगतीला-मोक्षाला-जातो.

## एक शंका व तिचे समाधान

योगाभ्यास करणाऱ्याच्या बाबतीत अर्जुनाला एक प्रश्न विचारण्यास लावून भगवद्‌गीतेने एका महत्त्वाच्या प्रश्नाचा उलगडा केलेला आहे:-हा योग अवघड आहे. त्यामुळे समजा, एकाद्या माणसाचा योगाभ्यास मध्येच सुटला, तो योगाची अंतिम सिद्धि प्राप्त करून घेऊ शकला नाही, तर त्याची गती काय ? ब्रह्ममार्गावर मूढ होऊन, त्या मार्गावरील स्थान सुटलेल्या साधकाचा नाश होतो काय (६.३७-३८) ? या प्रश्नाचे उत्तर भगवद्‌गीता असे देते:-इहलोकी किंवा परलोकी योगभ्रष्टाचा नाश होत नाही. कारण कल्याणकारी माणूस दुर्गतीला जात नाही ( पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते । न हि कल्याणकृत् कश्चिद् दुर्गतिं तात गच्छति ॥ ६.४० ). तर हा योगभ्रष्ट मरणानंतर पुण्यकर्मी अशा माणसांच्या 'लोकात' जाऊन बरीच वर्षे तेथे वास करून, मग तो शुद्ध आणि 'श्रीमंत' लोकांच्या घरी पुन: जन्माला येतो किंवा योग्यांच्या कुळांतच त्याला[९] जन्म प्राप्त होतो (६.४१-४२). या नवीन जन्मी त्याला पूर्वजन्मीचे बुद्धिसंस्कार प्राप्त होतात आणि तो पुन: योगाच्या सिद्धीसाठी प्रयत्न करावयास लागतो ( तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् । यतते च ततो भूय: संसिद्धौ कुरुनंदन ॥ ६.४३) आणि पूर्वी थोडाफार अभ्यास झाला असल्याने, चालू जन्मात त्याची योगात प्रगतीच होत रहाते, आणि तो शब्दब्रह्म ओलांडतो (६.४४) अशाप्रकारे प्रयत्न करणाऱ्या त्या योगाभ्यासकाची पापे नाहीशी होतात; आणि अनेक जन्मात सिद्धता झालेला तो पूर्वीचा योगभ्रष्ट[१०] परागतीला म्हणजे मोक्षाला जातो.



---

८. अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना । परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिन्तयन् ॥ ८.८; प्रयाणकाले मनसाचलेन भक्त्या युक्तो योगबलेन चैव । भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक् स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥ ८. १०; सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च । मूर्ध्न्याधायात्मन: प्राणमास्थितो योगधारणाम् ॥ ॐ इत्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन् मामनुस्मरन् । य: प्रयाति त्यजन् देहं स याति परमां गतिम् ॥ ८.१२.१३

९. अशा प्रकारचा जन्म दुर्लभ आहे ( ६.४२ )

१०. प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिष: ।
अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ॥ ६.४५

अनुक्रमणिका

श्री. स. आ. सप्रे

# इतिहासातील ज्ञान आणि आनंद*

## ( पूर्वार्ध )

परीक्षेकरिता इतिहासाचा अभ्यास करणे ही बहुतेकांना शिक्षाच वाटते आणि परीक्षा संपताच त्या इतिहासाचा त्यांना तात्काळ विसरही पडतो. परंतु इतिहास हा मोठा विषयही आनंददायक कसा होऊ शकतो. इतिहासामुळे आपले मनोविश्व कसे व्यापक होते, आपल्या अनुभूतींना कशी समृद्धता येते व आपल्या मानससंपदेत कशी बहुमोल आणि बहुविध भर पडते याचे दिग्दर्शन करणे हा प्रस्तुत लेखाचा हेतू आहे.

विवेचनाच्या सोयीसाठी इतिहासाचे दोन विभाग करता येतात : १) व्यापक स्वरूपाचा इतिहास २) विविक्षित देशाचा, कालखंडाचा मर्यादित स्वरुपाचा इतिहास. पहिल्या प्रकारच्या इतिहासामध्ये सर्व जगाचा व मानवसंस्कृतीचा विचार केला जातो. त्यामुळे आपल्याला एक नवी व्यापक दृष्टी येते. दुसऱ्या प्रकारच्या इतिहासाच्या अभ्यासामुळे अनेक तऱ्हेच्या, बहुरंगी व्यक्तिमत्वाच्या स्त्रीपुरुषांशी आपला परिचय होतो. मानवी स्वभावाच्या अतर्क्य गुंतागुंतीची आणि विलक्षण वैचित्र्याची आपल्याला कल्पना येते. प्रथमपासूनच दोन्ही प्रकारच्या इतिहासांचा अभ्यास करणे इष्ट होय.

पहिल्या प्रकारच्या व्यापक स्वरूपाच्या इतिहासात ग्रहमालेची निर्मिती, पृथ्वीचा जन्म, पृथ्वीची स्थित्यंतरे, पृथ्वीवरील जीवनिर्मिती, मानवी संस्कृतीचा विकास या विषयांचा अंतर्भाव होतो. निरनिराळ्या सजीव प्राण्यांचा उद्भव उदाहरणार्थ मधमाशा, विविध तऱ्हेचे मासे, चमत्कृतिजन्य उडण्याकरिता धडपडणारे पक्षी, सरपटणारे प्राणी व त्यांच्या भयानक लढाया, हळूहळू मोठे

---

*. हा लेख महापंडित बर्ट्रान्ड रसेल यांच्या "How to Read and Understand History" या अभिजात निबंधावर सर्वस्वी आधारलेला आहे. या निबंधात रसेलच्या विदग्ध पांडित्याचा आणि सर्वस्पर्शी प्रतिभेचा सुरेख आविष्कार झालेला आढळतो. हा निबंध प्रथम १९५७ मध्ये प्रसिद्ध झाला.

अनुक्रमणिका





होणारे स्तन प्राणी हे सर्व मनोरंजक विषय या विभागात येतात. त्यानंतर आदिमानवाच्या इतिहासाची सुरवात होते. विस्तवाचा शोध व गुहांचा उपयोग या घडामोडींचे विवेचन करता येते. जंगली श्वापदे व विषारी जनावरे यावर माणूस आपल्या बुद्धीच्या जोरावर कसा मात करतो हा सर्वच इतिहास अत्यंत रोमहर्षक आहे.

यानंतर मानवी संस्कृतीचा उदय होतो. इजिप्त आणि बॅबिलोनियामध्ये शेतीचा शोध लागतो. मातीची भांडी तयार करण्याच्या कलेत चांगलीच प्रगती होते. दगडाऐवजी मानव ब्रॉन्झ व नंतर लोखंडाचा उपयोग करू लागतो. शासन आणि धर्म या कल्पना पुढे येतात. इजिप्तमधील राजे, त्यांचे गगनचुंबी पिरामिड, ते बांधण्याकरिता राबविण्यात आलेले सहस्रावधि गुलाम, वर्षातून एकदाच अयनकाली सूर्यकिरणांनी प्रकाशित होणारी गूढरम्य देवालये या मनोवेधक घडामोडींचा वृत्तांत आपण वाचतो. यानंतर राजेरजवाडे, त्यांची प्रचंड सैन्ये, भव्य प्रासाद आणि राजवैभव यांचे युग सुरू होते. पर्शियन आणि बॅबिलोनियन लोकांचे शिलालेख आता वाचता येऊ लागल्यामुळे अगदी प्राचीन संस्कृतींच्या आपल्या ज्ञानात चांगलीच भर पडली आहे. हा सर्वच प्रांत मनोज्ञ आहे. आपल्या कल्पनाशक्तीला तो चांगलाच ताण देतो.

हस्तव्यवसाय आणि कला यांचा इतिहास असाच मनोवेधक आहे. गृहरचनेचा प्रारंभ, वाहतुकीची साधने, जहाजांचा उपयोग या सर्व घटना चित्तवेधक आहेत. मोठमोठ्या नद्यांमुळे मानवी संस्कृती अशी बदलत गेली हे जाणून घेणेही आवश्यक आहे. शेतीचा शोध, शासनसंस्था व राजे यांचा उदय, राज्यांच्या स्मारकाकरिता बांधलेल्या भव्य इमारती व नक्षीदार प्रचंड देवालयांची रचना, लेखनकलेचा शोध, गणितशास्त्राच्या मूलतत्वांचा बॅबिलोनियामध्ये लागलेला शोध हे संस्कृतीच्या विकासातील महत्वपूर्ण टप्पे होत. त्यानंतर ग्रीसमध्ये नव्या संस्कृतीचा उद्‌गम होईपर्यंत हजारो वर्षे मानवी संस्कृतीला अवकळाच आलेली होती. ग्रीसमधील नवीन संस्कृतीची सुरवात होमर पासून होते. आणि एका रोमन सैनिकाकडून आर्किमिडस मारला गेल्यानंतर तिच्या विनाशास प्रारंभ होतो. यानंतर हजारो वर्षे सांस्कृतिक दृष्ट्या अवनतीची व अंधकाराचीच गेली नंतर पंधराव्या शतकापासून प्रगतीचे नवीन युग सुरू झाले व आजतागायत ते चालू आहे. एकूण विचार केला तर प्रगती ही एकसारखी होत नाही. हजारो वर्षे

संस्कृती गतिशून्य राहिलेली आढळते. मात्र प्रगतीला एकदा चालना मिळाली तर तिची वाटचाल जोमदार आणि नेत्रदीपक असते.

समाज ज्यावेळी गतिशून्य असतो त्यावेळी एकप्रकारचे नैराश्य सर्वत्र पसरलेले आढळते. आपण काही विधायक कार्य करू शकू अशी भावना लोकांमध्ये जोम धरत नाही. उलट प्रगतीच्या कालखंडात माणूस मोठ्या उमेदीने काम करतो आणि काही असामान्य व्यक्तींच्या कर्तृत्वाला तर बहर येतो. अशा व्यक्तींच्या कार्याकडे दुर्लक्ष करण्याची प्रवृत्ती काही विचारवंतामध्ये दिसून येते. त्यांच्या मते प्रगती होते ती सर्व समाजामुळे. एकटीदुकटी व्यक्ती हे कार्य करू शकत नाही. परंतु ही विचारसरणी चुकीची आहे. उदाहरणार्थ चाकाचा शोध. हा शोध बहुधा एका व्यक्तीने किंवा अनेकांनी मिळून लावला असावा. परंतु त्यामुळे मानवी संस्कृतीत क्रांतिकारक बदल झाला. आज आपल्याला चाक ही अगदी सामान्य गोष्ट वाटते परंतु अमेरिकेतील मुळच्या लोकांना त्याची माहितीच नव्हती. युरोपिअन लोक अमेरिकेत गेले तेव्हाच प्रथम चाकाचा उपयोग तेथे सुरू झाला. औद्योगिक क्रांतीला अनेक संशोधक कारणीभूत झाले. हे असामान्य बुद्धिमत्तेचे संशोधक अकालीच मृत्यू पावले असते तर औद्योगिक क्रांती झालीच नसती. इतिहासाच्या अभ्यासात असाधारण व्यक्तींच्या कर्तृत्वाकडे दुर्लक्ष करणे निःसंशय चुकीचे होय.

संस्कृतीचा प्रसार होतो तो बहुधा लष्करी आक्रमणामुळे. आक्रमकांची संस्कृती श्रेष्ठ दर्जाची असेल तर पराभूत झालेले लोक ती लवकरच आत्मसात करतात. याच्या उलट पराभूत झालेले लोक सांस्कृतिकदृष्ट्या वरचढ असतील तर त्यांच्यामुळे आक्रमकांचा सांस्कृतिक दर्जा सुधारतो. उदाहरणार्थ ॲलेक्झांडरच्या विजयामुळे पूर्वेकडील देशात ग्रीक संस्कृतीचा प्रसार झाला. याच्या उलट पश्चिमेकडे तिचा प्रसार होण्याचे कारण रोमन लोकांनी ग्रीक लोकांचा पराभव केला हे होय.

सम्यक् इतिहासाचा अभ्यास करणाऱ्या काही पंडितांनी ऐतिहासिक घटनांची वाटचाल एका विवक्षित सूत्रानुसार होत आहे असे दाखविण्याचा प्रयत्न केलेला आढळतो. त्यामध्ये हेगेल, मार्क्स व स्पेंग्लर यांचा विशेषकरून उल्लेख केला पाहिजे.

हेगेलची इतिहासमीमांसा अवास्तव आणि अतर्क्य आहे. इतिहासाच्या गतीचे त्याने सांगितलेले सूत्र असे. कल्पना ( The Idea ) अशी काही एक

गोष्ट आहे. ती निरपवाद कल्पना (Absolute Idea) होण्याकरिता धडपडत असते. अशी ही कल्पना प्रथम एखाद्या देशात मूळ धरते. परंतु तेथे तिला अवसर मिळाला नाही तर ती दुसऱ्या देशात भ्रमण करते. तिचे प्रथम अस्तित्व चीनमध्ये होते. तेथे प्रगती होऊ न शकल्यामुळे ती हिंदुस्तानात गेली. तेथून पुढे ग्रीसमध्ये व नंतर इटलीमध्ये ती गेली. तिला बुद्धिमान लोकांपेक्षा विजयी सेनानीच अधिक पसंत पडतात. जर्मन लोकांच्यावर तिची विशेष मदार होती परंतु तेथेही तिचे वास्तव्य चिरकाल टिकणारे नाही. तिचा प्रवास नेहमी पश्चिमेकडे चालू असतो. आणि ती लवकरच अमेरिकेत जाईल. तिची जगप्रदक्षिणा पुरी झाल्यानंतर तिला निरपवाद कल्पनेचे स्थान प्राप्त होईल आणि पृथ्वीवर स्वर्ग अवतरेल व सर्वत्र आनंदी आनंद होईल, असे हे हेगेलचे रम्य भाकित आहे.

परंतु हे अनाकलनीय सूत्र म्हणजे हेगेलच्या अलौकिक द्रष्टेपणाचा निर्विवाद पुरावा होय, असे काही प्राध्यापक मानतात हे आश्चर्यच होय. मार्क्सच्या इतिहासमीमांसेत हेच सूत्र निराळ्या स्वरूपात अंतर्भूत आहे. 'कल्पने' ऐवजी 'उत्पादनाची साधने' व 'देश' याच्याबद्दल 'वर्ग' एवढाच बदल मार्क्सने केला आहे. 'निरपवाद कल्पना' म्हणजे वर्गरहित समाजरचना. परंतु मार्क्सचेही भाकित अद्यापि तरी खरे ठरलेले नाही.

स्पेंग्लरच्या इतिहासमीमांसेवर नैराश्याची दाट छाया पडलेली दिसते. त्याच्या मते आपल्या संस्कृतीचा ऱ्हास १९१४ मध्ये सुरू झाला असून तो थांबविणे अशक्य आहे. तिचा विनाश अपरिहार्य आहे. प्रत्येक संस्कृती उद्गम, उत्कर्ष व विनाश या अवस्थेतून जात असते. परंतु आपले हे सूत्र सिद्ध करण्याकरिता स्पेंग्लरने ऐतिहासिक घटनांचा निर्विकारपणे विचार केला नाही. आपल्या सूत्राला मारक अशा घटनाकडे त्याने सोयीस्कररीत्या डोळेझाक केली आहे. आपल्या सूत्रास अनुकूल अशा घटनांचा त्याने प्राभुख्याने विचार केला आहे. याशिवाय त्याच्या मीमांसेबद्दल काही महत्त्वाचे आक्षेप घेता येतात. एखादे सूत्र उद्गमन पद्धतीने काढता येईल इतकी संस्कृतींची संख्या मोठी नाही. शास्त्रीय ज्ञानामुळे मानवी संस्कृतीत जे मूलगामी फरक झाले आहेत त्याची स्पेंग्लरला जाणीव नव्हती. तसेच आधुनिक युद्धे जागतिक स्वरूपाची असतात इकडेही त्याचे दुर्लक्ष झाले.

इतिहासातून असे व्यापक स्वरूपाचे साधेसुधे सूत्र मांडता आले नाही तरी मर्यादित स्वरूपाचे काही निष्कर्ष काढता येतात. तसेच महाकाव्यातून

किंवा उत्कट नाट्यातून जसा आनंद आपल्यास मिळतो तशा स्वरूपाचा आनंद इतिहासाच्या अभ्यासातून मिळतो. याची उदाहरणे द्यावयाची झाल्यास 'मिडलटाऊन' व प्लुटार्कचा 'लाइव्हज' या दोन ग्रंथांची देता येतील. हे दोन ग्रंथ अगदी भिन्न स्वरूपाचे आहेत. 'मिडलटाऊन' या ग्रंथातील विवेचन खगोल शास्त्राप्रमाणे अत्यंत भावनाविरहित पद्धतीने काटेकोररीतीने केलेले आहे. ते अत्यंत विचारप्रवर्तक आणि बोधप्रद आहे. याच्या उलट प्लुटार्कच्या ग्रंथातील चित्रण नितांत कल्पनारम्य आहे. मानवी स्वभावाबद्दलच्या आपल्या ज्ञानात तो चांगलीच भर टाकतो. परंतु हे ज्ञान शास्त्राच्या चौकटीत बसेल अशा स्वरूपाचे नाही; तरीही ते व्यावहारिकदृष्ट्या अत्यंत उपयुक्त असते. घोड्याच्या मालकाला आपल्या घोड्याविषयी काही शब्दातीत ज्ञान असते तशा प्रकारचे हे ज्ञान आहे. शब्दातीत असले तरी त्याचा व्यवहारात सतत उपयोग होतो.

इतिहास शास्त्रशुद्ध पद्धतीने लिहावयाची कल्पना अलीकडची आहे. अशा इतिहासाचा विचार करण्यापूर्वी प्राचीन श्रेष्ठ इतिहासकारापासून आपल्याला काय शिकता येईल याचा विचार करणे इष्ट ठरेल.

हेरोडोट्स हा इतिहासकार इतिहासाचा जनक म्हणून विख्यात आहे. त्याचे ग्रंथ वाचणे अनेक कारणाकरिता आल्हादकारक आणि बोधप्रद ठरते. त्याच्या ग्रंथात अनेक अत्यंत मनोरंजक अशा घटनांचे नाट्यपूर्ण असे वर्णन आढळते. उदाहरणार्थ कँडॉलस राजाची गोष्ट घ्या. त्याची राणी अत्यंत देखणी होती. तिच्या अलौकिक लावण्याची आपल्याप्रमाणे इतर कोणासही संपूर्ण कल्पना नाही याची त्याला खंत वाटे. आपला या भाग्याबद्दल कोणी हेवा करीत नाही याचा त्या मूर्ख राजाला विषाद वाटे. तेव्हा आपल्या पंतप्रधानाने ती विवस्त्रावस्थेत स्नानगृहाकडे जात असताना पडद्यामागून तिला पाहावे अशी त्याने व्यवस्था केली. परंतु राणीने प्रधानाचे पडद्याखालून दिसणारे पाय पाहिले आणि तिच्या तळपायाची आग मस्तकाला गेली. तेथेच तात्काळ तिने प्रधानास फर्माविले : तू फार मोठे पाप केले आहेस. त्याच्या क्षालना-करिता एक तर तू मरणास तयार झाले पाहिजेस किंवा राजाला मारून माझ्याशी विवाहबद्ध झाले पाहिजेस. पंतप्रधानाने अर्थातच दुसरा पर्याय स्वीकारला. अशा चविष्ट गोष्टी सांगण्यात हेरोडोटसचा हातखंडा आहे मात्र अचूकतेपेक्षा नाट्याकडे त्याचे लक्ष अधिक असते.

हेरोडोटसचे दुसरे महत्त्वपूर्ण वैशिष्ट्य म्हणजे मानवजातिशास्त्राच्या दृष्टीनेही त्याचे लिखाण मोठे लज्जतदार वाटते. निरनिराळ्या देशातील लोक

व त्यांच्या चालीरीती यांचे तो असे काही बेमालूम वर्णन करतो की नकळत वाचक त्या देशकालपरिस्थितीशी केव्हाच समरस होऊन जातो. त्याच्या इतिहासाचा मुख्य विषय म्हणजे युरोप आणि आशिया यामधील विग्रह. हा मोठा व्यापक आणि गुंतागुंतीचा विषय तो मोठ्या कौशल्याने आणि कलात्मकरीतीने हाताळतो.

थसिडिडस हा दुसरा महान इतिहासकार. हेरोडोटसशी तुलना करिता त्याच्या विषयाची व्याप्ती थोडी संकुचित वाटते. परंतु त्याचे लिखाण अधिक सत्यनिष्ठ आणि कलात्मक वाटते. त्यामध्ये एक प्रकारची शिस्त आणि प्रमाणबद्धता आहे. वायफळ गोष्टींना त्यात स्थान नाही किंवा उगाच मनोरंजक गोष्टी तो सांगत नाही. परंतु आपल्या विषयाची उभारणी मात्र तो अप्रतिमरीतीने करतो. त्यामध्ये भव्यतेची प्रचीती येते. अथेन्स आणि स्पार्टा यामधील युद्ध हा त्याचा विषय होय. ग्रीक शोकांतिकेशी त्याच्या इतिहासाचे साम्य आहे. माणूस स्वतःच्या नाशास स्वतःच कारणीभूत होतो ह्याचे तो प्रभावी चित्रण करतो. योग्य मार्ग कोणता याची जाणीव असूनही लोक भलत्याच मार्गाचा अवलंब करून विनाशाच्या गर्तेत कसे पडतात हे त्याच्या प्रतिपादनातील मध्यवर्ती सूत्र आहे. दैव किंवा नियती मानवी जीवनास साकार करते आणि त्याच्या विध्वंसास नियतीच कारणीभूत होते, अशा तऱ्हेचा प्रतिध्वनी त्याच्या लिखाणातून उमटतो. दैवापुढे सर्वजण हतबल ठरतात ह्या कल्पनेचे त्याने केलेले चित्रण विलक्षण हृदयस्पर्शी आहे.

प्राचीन इतिहासकारांमध्ये प्लुटार्क हा सर्वात अधिक प्रभावशाली ठरला आहे. परंतु इतिहासकारांपेक्षा राजकीय तत्त्ववेत्ते व राजकारणी पुरुष यांच्यावर त्याचा पगडा अधिक आहे, याची दोनच उदाहरणे पुरी होतील. रूसोने आपल्या कल्पना त्याच्याकडून घेतल्या आणि ॲलेक्झांडर हॅमिल्टनने महत्त्वाकांक्षेबाबत प्लुटार्कच्या नायकांचे अनुकरण केले. या दोघांच्या मनःप्रवृत्तीवर प्लुटार्कचा ठसा स्पष्ट उमटलेला दिसतो, प्लुटार्कची सत्यनिष्ठा मर्यादितच होती. आपले लिखाण नाट्यपूर्ण व रसाळ कसे होईल इकडे त्याचे अधिक लक्ष होते. त्यामुळे अनेक लहान सहान गोष्टीही तो रंगवून सांगतो. उदाहरणार्थ मार्क ॲन्टनी हा मोठा अधिकारी असतानाही एका तृतीय श्रेणीच्या नटीबरोबर कसा सर्वत्र फिरत असे व त्यामुळे अधिकारी किती नाराज होत असत किंवा सिनेटच्या बैठकीत सदस्यांनी काहीही वाचावयाचे नाही असा सक्त निर्बंध असताना तरुणपणी ब्रुटसच्या आईकडून आलेले प्रेमपत्र सिनेटच्या बैठकीत सीझरने

वाचल्यामुळे उठलेले वादंग याचे त्याने केलेले रसीले वर्णन. प्लुटार्क हा एक चतुर गोष्टीवेल्हाळच समजला पाहिजे.

इतिहास निरनिराळ्या पद्धतीने कसा लिहिता येतो हे हेरोडोटस, थुसिडिडस् आणि प्लुटार्क यांच्या लिखाणावरून स्पष्ट होते. गिबनने या सर्वांहून अगदी निराळ्याच पद्धतीचा अंगिकार केला. इतिहासकार म्हणून गिबनमध्ये काही मोठी वैगुण्ये आहेत हे निर्विवाद होय. त्याचे पांडित्य तोकडे आहे. त्याच्या सर्व व्यक्तिचित्रांवर अठराव्या शतकाची दाट छाया पडलेली आढळते. त्याच्या इतिहासात राजेमहाराजे, युद्धे व राजकारण यांनाच महत्वाचे स्थान आहे. सर्वसामान्य जनता व आर्थिक परिस्थिती यांचा तो विशेष विचार करीत नाही. इतके असूनही तो एक श्रेष्ठ इतिहासकार आहे आणि त्याचे लिखाण नेहमीच प्रसन्न आणि आल्हादकारक वाटते.

गिबनच्या लिखाणाचे एक वैशिष्टय म्हणजे त्यातील उपरोध आणि नर्म विनोद. त्याची व्यक्तिचित्रे अनेकदा दुबळी वाटतात; परंतु त्याचा मुख्य गुण म्हणजे ऐतिहासिक घडामोडींचा धावता रंगीत चित्रपट वाचकाच्या मनःचक्षूंपुढे समर्थपणे उभा करण्याचे त्याचे असामान्य कौशल्य. एकाच ग्रंथात दुसऱ्या शतकापासून पंधराव्या शतकापर्यन्तचा इतिहास कथन करणे हे एक अवाढव्य काम होते. गिबनने ते फारच अप्रतिमपणे पार पाडले आहे. त्यातील प्रमाणबद्धता आदर्शभूत आहे. आपल्या ग्रंथातील मध्यवर्ती सूत्राचा त्याला कधीच विसर पडलेला आढळत नाही. त्याच्या या असामान्य गुणांमुळे, त्याच्यामध्ये इतर काही दोष असतानाही तो एक प्रथमश्रेणीचा इतिहासकार ठरतो हे निर्विवाद आहे.

केवळ मोठ्या इतिहासकाराचे ग्रंथ वाचून इतिहासाचे सर्वांगीण ज्ञान होते असे नाही. त्याकरिता आठवणी आणि चरित्रे यांचे वाचनही आवश्यक आहे. अशा पुस्तकातून अत्यंत बोधप्रद, मनोरंजक आणि महत्वाची माहिती मिळते. इतिहासाचा अशा रीतीने अभ्यास केला तर मनमुराद आनंदही मिळतो आणि असंभाव्य अशा गोष्टी प्रत्यक्षात घडतात याचा प्रत्यय येतो.

थोर व्यक्तींचे खरेखुरे मूल्यमापन त्यांच्या जीवनाचे जवळून निरीक्षण केले तरच होऊ शकते. काही महनीय व्यक्ती अशा असतात की त्यांच्या जीवनाचा आपण जसजसा अधिक अभ्यास करतो तसतशा त्या अधिकाधिक आदरणीय वाटू लागतात. स्पिनोझा आणि लिंकन हे अशा तऱ्हेचे श्रेष्ठतम महापुरुष होते. याच्या उलट नेपोलियनबद्दलचा आदर त्याच्या जीवनाचा सूक्ष्म विचार केला म्हणजे कमी होऊ लागतो. नेपोलियन जोसेफिनबरोबर विवाहबद्ध झाल्यानंतर

अनुक्रमणिका

पहिल्याच रात्री तो पलंगावर चढत असताना जोसेफिनच्या छोट्या कुत्र्याने त्याच्या पायाचा चावा घेतला. यात नेपोलियनचा क्वचित काही दोष नसावा. परंतु असे अनेक प्रसंग आहेत की ज्यामुळे नेपोलियनबद्दलचा आपला आदर कमी होतो. त्याचा परराष्ट्रमंत्री टॅलेरंड याचा तो पदोपदी अपमान करीत असे. त्याला तो लंगडा म्हणून तर हिणवीत असे, पण त्याची पत्नी वाईट चालीची होती याचीही त्याला तो अकारण जाणीव करून देई. अशाच एका प्रसंगानंतर नेपोलियन निघून गेल्यानंतर टॅलेरंड तेथे उपस्थित असलेल्या लोकांना खांदे उडवित म्हणाला: " काय दुर्दैव आहे की अशा थोर व्यक्तीला शिष्टाचाराचे वावडे असावे" मेरी लुईबरोबर प्रातिनिधिक पद्धतीने (proxy) विवाह केल्यानंतर तिच्या स्वागताकरिता नेपोलिअन फरान्सच्या सरहद्दीपर्यंत गेला. त्या प्रसंगी मोठा समारंभ व थाटाची दरबारी मेजवानी असा कार्यक्रम नियोजित करण्यात आला होता. नेपोलियनच्या ऋणानुबंधातील सर्व मोठे लोक व लावण्यवती स्त्रिया या बादशाही समारंभाकरिता उपस्थित होत्या. परंतु समारंभाची व मेजवानीची वेळ टळून गेली तरी नेपोलियनचा व त्याच्या सम्राज्ञीचा पत्ता नव्हता. नंतर त्याच्या खाजगी कारभाऱ्याने मोठ्या खुबीने चवकशी केली असता असे आढळून आले की तो इतका संगमोत्सुक झालेला होता की समारंभ संपेतोपर्यन्त थांबण्याचा त्याला विवेकच राहिला नाही. रशियाचा झार ॲलेक्झांडर हा तरुण होता तरी त्याने नेपोलियनच्या भपकपणाचा पुरेपूर फायदा उठवला. त्या दोघांच्या पत्रव्यवहारात ॲलेक्झांडर अगदी साळसूद व साधाभोळा वाटतो तर नेपोलियनचा उथळपणा पदोपदी दृष्टोत्पत्तीस येतो. झारने याबाबत आपल्या आईस लिहिले आहे: शेवटी हसतो त्याचेच हास्य खरे. झारचा कावा नेपोलियनच्या लक्षात कधीच आला नाही.

दोन अत्यंत परस्परविरोधी स्वभावाच्या व्यक्तींची भेट झाली म्हणजे काय होते हे पाहणे मोठे मनोरंजक असते. रॉबर्ट ओवेन आणि रशियाचा झार निकोलस यांची भेट इतिहासप्रसिद्ध आहे. दोघांच्या व्यक्तिमत्त्वात दोन ध्रुवांचे अंतर असताना त्यांच्या भेटीत भलतीच आपुलकी दिसून आली. ओवेन हा निरीश्वरवादी, साम्यवादी व एकेकाळी राजकीय बंडखोर म्हणून प्रसिद्ध होता. याच्या उलट झार हा उन्मत्त असा हुकूमशहा होता. ओवेनचा न्यू लानार्क येथील आदर्श कारखाना पाहण्याकरिता झार मुद्दाम स्कॉटलंडला गेला. तो कारखाना व तेथील व्यवस्था पाहून तो बेहद्द खूष झाला; इतकेच

नव्हे तर रशियात असे कारखाने काढण्याकरिता ओवेनला त्याने विनंती केली. ओवेनही झारच्या या प्रशंसेने अगदी विरघळून गेला.

याच्या उलट गटे आणि बीथोव्हेन यांच्या भेटीतून परस्परांबद्दल आपुलकी निर्माण व्हावी अशीच कोणीही अपेक्षा केली असती, परंतु प्रत्यक्षात त्यांचे बिनसले. याचे कारण म्हणजे गटेने त्याला दरबारी शिष्टाचार शिकविण्यास सुरवात केली. साहजिकच बीथोव्हेनला ते रुचले नाही.

अलेक्झांडर व ॲरिस्टॉटल यांच्या संबंधाबद्दल असाच गैरसमज आहे. अलेक्झांडर हा ॲरिस्टॉटलचा शिष्य आणि त्याची व्यावहारिक सूज्ञता ही ॲरिस्टॉटलच्या शिकवणुकीचे फळ होय. हेगेल तर म्हणतो की यावरून तत्त्वज्ञान व्यवहारांतही कसे उपयोगी पडते ते दिसून येते. परंतु खरी वस्तुस्थिती अगदी निराळी होती. अलेक्झांडर हा मनातून ॲरिस्टॉटलचा द्वेषच करीत असे आणि त्या उभयतांना परस्परांच्या कार्याची महती नव्हती. अलेक्झांडर ज्यावेळी जग पादाक्रांत करीत होता त्यावेळी ॲरिस्टॉटल राज्यशास्त्रावरील आपला ग्रंथ लिहिण्यात गढून गेला होता. दोन समकालीन व्यक्तींना परस्परांचे महत्व कळतेच असे नाही.

इतिहासामुळे मानवी स्वभावाबद्दलच्या आपल्या ज्ञानात मौलिक भर पडते. नवीन बदललेल्या परिस्थितील लोक कसे वागतील याचा अंदाज करता येतो. स्त्रियांच्या बाबतीत त्या नेहमी जात्याच मर्यादशील व संयमी असतात, असा आपला समज असतो. परंतु त्यांच्याकडे राजसत्ता आल्यास त्या कशा वागू शकतात याची इतिहासात अनेक भयानक उदाहरणे आहेत. त्या सत्तेकरिता, स्वार्थाकरिता, सुखोपभोगाकरिता आपल्या मुलानाही कैद करतात व मारतातही असे इतिहासावरून दिसून येते. रशियाची कॅथेरीन दि ग्रेट ही वृद्धापकाळी भलतीच लठ्ठ झाली होती त्यामुळे तिला आपल्या प्रियकरांना भरमसाट पगार द्यावा लागे. तरी ते परदेशी पळून जाण्याचा प्रयत्न करीत. पळून जाताना जर कोणी प्रियकर सापडला तर त्याचे मरण ओढवलेच.

इतिहासाच्या एखाद्या कालखंडाची चांगली माहिती झाल्यावर त्याकाळचा पत्रव्यवहार व आठवणी वाचणे फारच बोधप्रद ठरते. इतिहासकारांना पुढील सर्व घटना माहित असल्यामुळे त्याच्या लिखाणावरून सर्व काही अनिवार्य होते असे वाटण्याचा संभव असतो. याच्या उलट समकालीनांना भविष्यात काय लिहिलेले आहे याची कल्पनाच नसल्यामुळे त्यांचा पत्रव्यवहार वाचणे फारच मनोरंजक ठरते. अनेकदा त्यांच्या अज्ञानाचे व अदूरदृष्टीचे

आश्चर्य वाटते. उदाहरणार्थ नेपोलियन एल्बा बेटातून सुटून फरान्समध्ये परत आल्यामुळे मोठा अनवस्था प्रसंग ओढवला असताना लुई फिलिप आपल्या अनेक पत्रात आपल्या मुलांच्या डांग्या खोकल्याबद्दल हळहळ व्यक्त करीत असल्याचे दिसून येते. लॉर्ड गॉवर ऑस्टरलिझच्या लढाईतून पळ काढताना संचित झाला होता तो रस्ते खराब आहेत व आपल्या गाडीच्या स्प्रिंगा ढिल्या झाल्या आहेत म्हणून.

मनुष्यस्वभावाच्या या हलक्याफुलक्या मनोरंजक गोष्टीऐवजी इतिहासाच्या अनेक महत्वाच्या अंगांचा आता विचार करणे अधिक योग्य होईल. प्रथम लष्करी धडामोडींचा आपण विचार करू. युद्धांच्या व लढायांच्या तपशीलवार वर्णनांनी इतिहासाची पाने भरलेली आढळतात. परंतु लढाईच्या तंत्रामध्ये झालेल्या सुधारणांचा विशेष विचार केलेला आढळत नाही. लढाईच्या बदलत्या तंत्रांचा सर्वसामान्य जनतेच्या जीवनावरही दूरगामी परिणाम होत असतो. युद्ध हाही एक प्रकारचा व्यवसायच होय. जोन ऑफ आर्कच्या असामान्य नेतृत्वामुळे फरेंचांनी ब्रिटिशांवर मात केली असा एक समज आहे. परंतु खरी परिस्थिती अशी आहे की तोफखान्याच्या उपयोगामुळे फरेंचांना विजयश्री प्राप्त झाली. इंग्रजांचे धनुष्यबाण तोफखान्यापुढे अगदीच निष्प्रभ ठरले.

फरेंच राज्यक्रांतीनंतर युद्धतंत्राला एक नवीनच कलाटणी मिळाली. युद्धात यशस्वी होण्याकरिता सर्वसामान्य जनतेचाही पाठिंबा असला पाहिजे व सर्व जनता युद्धकार्यात सहभागी झाली पाहिजे असा नवीन विचार दृढ होऊ लागला. त्यापूर्वी युद्ध हा एक राजेरजवाडे व त्यांचे पोटभरू सैन्य यांचा उद्योग होता. फरांसमधील राज्यक्रांतीचा बीमोड करण्याकरिता युरोपातील सर्व प्रतिगामी शक्तींनी आक्रमक पवित्रा घेतला तेव्हा फरांसमधील प्रत्येक शेतकरी आणि इतर सर्वसामान्य जनताही राज्यक्रांतीच्या संरक्षणार्थ सरसावून पुढे आली. या शेतकऱ्यांना अमीरउमरावांच्या शेतीचा काही भाग मिळालेला होता आणि युद्धातील यशोपयशावर त्यांचे दैनंदिन जीवन अवलंबून होते. फरेंच राज्यक्रांतीच्या यशाकरिता बुद्धिमान वर्गानेही कंबर कसली आणि दारूगोळा आणि इतर युद्धसाहित्य यामध्ये अनेकविध सुधारणा केल्या. आता तर युद्ध जनतायुद्ध झाले पाहिजे हा विचार सर्वमान्य झाला आहे. या कारणाकरिता युद्धामध्ये लोकशाही राष्ट्रे विजयी होण्याची शक्यता अधिक आहे.

अनुक्रमणिका





आर्थिकदृष्टचा प्रबल असलेले राष्ट्रच युद्धात विजयी होणार असा एक समज आहे. पण तो तितकासा बरोबर नाही. रोमन साम्राज्याचा जर्मन व अरब आक्रमक पाडाव करू शकले याचे कारण त्यांची आर्थिक परिस्थिती अधिक चांगली होती हे नसून ते अधिक पराक्रमी आणि लोभीवृत्तीचे होते हे होय. युद्धनैपुण्य आणि निर्धार याबाबत दोन राष्ट्रे तुल्यबल असल्यास आर्थिक-दृष्टचा संपन्न असलेले राष्ट्र विजयी होण्याची शक्यता मात्र अधिक असते.

बंदुकीच्या दारूमुळे युद्धतंत्रात जशी क्रांती झाली तशाच प्रकारची क्रांती औद्योगीकरणामुळे युद्धतंत्रात आता होत आहे. पूर्वी एखादा चिमुकला देश एखाद्या मोठ्या देशाशी दीर्घकाळ टक्कर देऊ शकत असे. परंतु आता अवि-कसित राष्ट्रांना विकसित राष्ट्रांबरोबर युद्धामध्ये दीर्घकाळ मुकाबला करणे शक्य होणार नाही. औद्योगिकदृष्टचा सामर्थ्यशाली देशांचा क्रम पुढीलप्रमाणे लावता येईल : अमेरिका, जर्मनी, रशिया, ग्रेटब्रिटन व जपान. बाकीची राष्ट्रे नगण्यच होत. चीनचा मात्र अपवाद केला पाहिजे. स्वसंरक्षणार्थ चीनने विलक्षण चिकाटी दाखविली आहे. जागतिक युद्धामध्ये वरील राष्ट्रांपैकी दोन राष्ट्रे पराभूत झाल्यास, उरलेल्या तीन राष्ट्रामध्ये सर्व जगाचे लष्करी सामर्थ्य केंद्रित होईल. अखेरीस हे सामर्थ्य अनेक राष्ट्रांच्या केंद्रिय सरकारच्या नियंत्रणाखाली जाणे अपरिहार्य दिसते. अर्थात यामध्ये अनंत अडचणी आहेत. त्याकरिता किती काळ लागेल व तत्पूर्वी किती युद्धे होतील याचा अंदाज करणे कठीणच आहे.

आर्थिक इतिहास ही एक इतिहासाची अत्यंत महत्वाची शाखा आहे. परंतु अशा प्रकारचा इतिहास प्राचीनकाळी किंवा मध्ययुगातही लिहिण्याची प्रथा नसल्याने त्या काळाबाबतची आर्थिक परिस्थितीविषयक माहिती अपुरीच असते व उपलब्ध असलेली माहिती संपूर्णतः विश्वसनीयही असत नाही. अशा प्रकारच्या इतिहासामध्ये महत्व असते ते सर्वसामान्य लोकांच्या जीवनाला. त्यामध्ये केवळ सत्ताधाऱ्यांचा किंवा श्रेष्ठ व्यक्तींचा विचार अभिप्रेत नसतो. या इतिहासाच्या अभ्यासामुळे अनेक महत्त्वाच्या प्रश्नांवर उजेड पडतो. उदाहर-णार्थ, प्राचीन इजिप्तमध्ये सर्वसाधारण शेतकऱ्याचे जीवनमान कसे होते? रोमन साम्राज्यात गुलामांचे जीवन अगदी असह्य होते का ? मध्ययुगीन काळात शेतीवर राबणारे मजूर व औद्योगिक क्रांतीच्या प्रारंभी कारखान्यात काम कर-णारे मजूर यापैकी कोणाचे जीवन अधिक सुसह्य होते. अशा प्रकारच्या इतिहा-सामध्ये नाविन्याचा अभाव प्रकर्षाने जाणवतो. साचेबंद पद्धतीने अशा प्रकारचा इतिहास लिहिला जातो आणि जवळजवळ प्रत्येक इतिहासकार आपल्या काळा-

बद्दल निराशाजनक उद्‌गार काढतो. उदाहरणार्थ शेतकऱ्यांच्या दारुण अवस्थेचे चित्र नेहरूंनी रेखाटलेले आढळते. परंतु खरे पाहिले तर हा त्याच्या अज्ञानाचा भाग असतो. हे इतिहासकार आपल्या विषयांच्या संकुचित क्षेत्रातच सतत निमग्न असल्यामुळे त्यांचे इतर देशाविषयी किंवा कालखंडाविषयीचे ज्ञान अगदी तुट-पुंजे असते वास्तविक शेतकरी वर्ग हा नेहमीच कर्जात बुडलेला असतो. याचे कारण म्हणजे त्यांचा भलताच आशावाद आणि दुष्काळ, अवर्षण वगैरे नैसर्गिक आपत्तींचा नियमित फेरा. परंतु इतिहासकारांना याची जाणीव असत नाही. सदासर्वकाळ अशीच परिस्थिती होती हे त्यांच्या लक्षात येत नाही. विशेषज्ञते-मुळे ( specialisation ) असे दोष निर्माण होतात.

आर्थिक इतिहासाच्या परिशीलनातून असे दिसून येते की नागरी आणि ग्रामीण विभाग यामधील झगडा सतत चालूच आहे. संस्कृतीचा विकास विशेष करून नागरी विभागातच झालेला आढळतो तर धर्मपरायणता हे ग्रामीण विभा-गाचे वैशिष्ट्यच होय. आज आपल्याला बहुमोल वाटणाऱ्या सर्व गोष्टी नागरी संस्कृतीतूनच निर्माण झालेल्या आहेत. ग्रीक तत्त्वज्ञान आणि शास्त्रे यांचा उगम आशिया मायनर व सिसली येथील संपन्न शहरातच झाला. तेथून पुढे त्याचा प्रसार अथेन्स व ॲलेक्झांड्रिया येथे झाला. रोमन लोक प्रारंभी व्यवसायाने शेतकरीच होते. प्युनिक युद्धात यशस्वी झाल्यानंतर ते संपन्न झाले व त्यांनी स्वतः ग्रीक संस्कृतीचा व पौर्वात्य सुखविलासी जीवनाचा अंगिकार केला. शेतीचे काम त्यानी गुलामावर व परामूत लोकांवर सोपविले. रोमन साम्राज्याच्या निरनिराळ्या विभागामध्ये व्यापारउदीम वाढतच गेला आणि नवीन नवीन शहरे उदयास आली. ख्रिस्तपूर्व ६०० शतकापासून इ. स. २०० शतकापर्यंत शहरांना अपूर्व असे महत्व प्राप्त झाले. याच कालखंडात प्लेटोचा रिपब्लिक हा जागतिक वाङ्मयाला ललामभूत ठरलेला शाश्वत ग्रंथ निर्माण झाला.

पुढे रानटी टोळ्यांच्या आक्रमणामुळे रोमन साम्राज्यातील रस्ते उध्वस्त झाले व प्रवास करणे धोक्याचे होऊन बसले. त्यामुळे नागरी संस्कृतीच्या ऱ्हासास प्रारंभ होऊन ग्रामीण विभागाचे वर्चस्व वाढू लागले. मध्ययुगातील इटालियन संस्कृतीमध्ये शहरे व उद्योगधंदे यांना महत्व उरले नव्हते. ती संस्कृती ग्रामीण स्वरुपाची व सरंजामशाहीवर आधारलेली होती. ( अपूर्ण )

प्रा. प्र. रा. दामले

# 'सेवाग्रामचे परिसरात'

गांधीनी आपल्या सार्वजनिक जीवनात व त्याचा अवश्यभाग म्हणून प्रथम आफ्रिकेत नंतर अहमदाबादला व १९३० च्या चळवळीत तो सोडल्यानंतर लवकरच सेवाग्राम येथे आश्रम स्थापले. या आश्रमात गांधीनी स्वतः आपणास व आपल्या निकटवर्ती अनुयायांस एका विशिष्ट प्रकारे शिस्त लावून शरीर आणि मन ही इच्छित सार्वजनिक कार्य करण्यास समर्थ व्हावीत म्हणून प्रयत्न केला. साबरमती आश्रमाला ऐतिहासिक दृष्ट्या महत्व असले तरी आज प्रायः परदेशी पाहुण्यांनी भेट देण्याचे एकस्थान इतकेच त्याचे स्वरूप राहिले आहे. परंतु सेवाग्राम आश्रम त्या मानाने आजही जागृतावस्थेत आहे व प्राण नसलातरी निदान शारीरक्रिया प्रारंभीच्याच आजही चालू ठेवण्याचा तेथे प्रयत्न केला जातो. सेवाग्राम या स्थानाची निवडही गांधीच्या याबाबतचा दृष्टिकोन स्पष्ट करिते. आज त्या आसमंतात काही भरभराट आली आहे व तेथे अनेक सुविधा उपलब्ध आहेत. परंतु गांधी तेथे राहावयास गेले तेव्हा शहरापासून दूर, काहीसे रोगग्रस्त व कसल्याच सुखसोयी नसलेले ते ठिकाण होते. भारतातील खेड्यांचे जीवन सुधारावयाचे तर आपण तशाच अडचणीच्या खेड्यात स्वतः राहून पाहिले पाहिजे; व सुधारणा काय व कशी करता येते हे प्रत्यक्ष करून दाखविले पाहिजे. ही गांधीची भूमिका होती. आजही गांधी निवास करीत ती झोपडी व इतर त्यावेळी बांधलेल्या साध्या इमारती तशाच ठेवल्या आहेत व वापरल्या जातात. गांधीच्या एका अमिरकन चाहत्याने आपल्या वडिलांच्या स्मृत्यर्थ एक अतिथीगृह बांधण्याचा आपला मनोदय गांधीना सांगितला तेव्हा गांधीनी एकच अट घातली ती अशी की; आश्रमातील इतर इमारतीप्रमाणेच ती अगदी साधी असावी व फार थोड्या खर्चात बांधली जावी. आश्रमातील सर्वच व्यवस्था या दृष्टीकोनातून केली गेली आहे व आजही जी कांही मंडळी आश्रमात राहतात ती पहिल्या प्रथा शक्यतो संभाळतात. आज देशात सामाजिक कार्य करण्याकरिता शासकीय किंवा खाजगी संस्था चालतात त्यातील अद्यावत सुखसोई व वारेमाप खर्च याचा विचार साहजिकच

मनात येतो व हे जे चाललेले आहे ते गांधींच्या शिकवणुकीशी, व आचरणाशी अत्यंत विसंगत आहे हे प्रामुख्याने मनात येते.

मी आश्रमात तीन दिवस होतो. मी येणार असे आधी कळविले होते व माझी राहण्याची तेथे अगत्यपूर्वक व्यवस्था केली गेली. आज आश्रमात असणाऱ्या व्यक्तींपैकी श्री. प्रभाकरजी, श्री. चिमणलाल भाई शहा व श्रीमती उर्मिलाबेन गांधी ही गांधींच्या निकटवर्तियांपैकी होती व कोणातरी थोर पुरुषाच्या संगतीत ज्या व्यक्तींचे दिवस गेले आहेत त्यांची वृत्ती व राहणी यात जो सूक्ष्म परंतु खोल फरक व्हावा तो त्यांचेमध्ये स्पष्ट दिसून येतो. गांधी १९४५–४६ मध्ये येथून गेले नंतर ते येथे येऊ शकले नाहीत. परंतु त्यानंतरही गांधींच्या संदेशाचे उत्कट आकर्षण असलेली कांही थोडी मंडळी येथे आली व ती येथे आहेत. मला त्या सर्वांचा सहवास फार सुखद वाटला व गांधीचे थोरपणाची ही छोटी प्रतिबिंबे आहेत ही जाणीव झाली.

या आश्रमाच्या आवारात वावरताना कित्येक लहानमोठ्या गोष्टी नजरेस येतात. आश्रमात असताना ज्या अनेक गोष्टी गांधी स्वतः नियमित करीत त्यातील एक गोष्ट म्हणजे आश्रमवासीयाचे जेवण चालू असता वाढण्यास मदत करणे व याबद्दल सर्व प्रकारची देखरेख ठेवणे. स्वच्छता, नियमितपणा, गोंगाट न करणे, थुंकरे न करणे, अन्न किंवा इतर कांहीही वस्तू फुकट न घालविणे, अशा अनेक लहानसहान बाबींकडे गांधी स्वतः लक्ष पुरवीत. तसे छोटे छोटे फलक ठिकठिकाणी दिसतात व आजही त्यातील सूचनांकडे लक्ष दिले जाते. गांधींच्या कुटीपासून कांही थोड्या अंतरावर व्याधिग्रस्त परचुरे शास्त्रींकरिता उभारलेली झोपडी दिसते व स्वतः गांधींनी त्यांची तेथे सेवा केली याची आठवण येते. गांधी तेथे असताना पहाटेस व संध्याकाळी ज्या झाडाखाली प्रार्थना होई तेथेच आताही होते. त्या झाडाचा आता मोठा वृक्ष झाला आहे. त्यावेळी गांधी बसत ते आसन एक उशी व टेकायला घेत ती फळी आजही तेथे आणून ठेवतात. ती फळी पाहून लक्षात येते की राहाणी साधी असावी हे गांधी सांगत आपण स्वतः निक्षून तसे आचरण केल्यावर.

आर्थिक व व्यावहारिक दृष्टचा आश्रम हा आज सुस्थितीत आहे. आश्रमाचे खर्चाकरिता काही लक्ष रुपयाचा ट्रस्ट केला गेला आहे व शेती, गोशाळा वगैरे तेथे चालवितात. एक लहानसे वर्कशॉपही आहे. असे असले तरीही या कार्यात साहजिकच जिवंतपणा नाही व देशात चाललेल्या घडामोडींवर येथील कार्याचा दूरतःही काही परिणाम होईल किंवा आजच्या लोकनेत्याना

असल्या आश्रमातील कार्याचे काही महत्व वाटते असे दिसत नाही. गांधींचे हे आश्रम व गांधीनी चालवलेला अन्यायाशी झगडा याचा परस्पर निकट संबंध होता व त्यातला अन्यायाचा किंवा असत्याचा प्रतिकार हा भाग गेला तर पहिला भाग साहजिकच दुर्बळ व निष्प्राण असा होतो. तरीपण अद्यापही ज्याची इच्छा असेल त्याला थोड्याच वर्षापूर्वी देशाचे स्फूर्तिस्थान असलेल्या या आश्रमातून काहीतरी दिलासा मिळेल व कदाचित अशा एखाद्याकडून पुन्हा तो आश्रम काही प्रमाणात जागृत केला जाईल अशी थोडी आशा वाटते.

ठरल्याप्रमाणे श्रीमन्नारायण यांना भेटायला मी दुसऱ्या दिवशी गेलो. वर्धा शहरापासून जरा दूर सेवाग्रामचे रस्त्यावर श्रीमन्नारायण राहतात. नुकत्याच झालेल्या दोन परिसंवादाच्या कामाची निरवानिरव ते करीत होते. आमच्या बोलण्यात साहजिकच त्या परिसंवादांचा विशेष उल्लेख आला. दोनही विषय गांधी विचाराशी संबद्ध असे होते. पहिली बाब Rustisheep in Industry याबद्दलची चर्चा. श्री. जयप्रकाशांनी याबाबत मुंबईत व इतरत्र काही विचार प्रथम प्रगट केले होते. परंतु ते स्वतः आजारी असलेमूळे वर्धा पवनार येथील चर्चेस येऊ शकले नव्हते. त्या चर्चेकरिता श्रीमन्नारायण यांनी तयार केलेला वर्किंग पेपर श्री. विनोबा यांनी त्या परिसंवादाचे उद्घाटन केले त्यावेळी केलेले भाषण व शेवटी झालेला ठराव याची एक प्रत श्रीमन्नारायण यानी मला दिली. त्या परिषदेला संदेश म्हणून आलेल्या श्रीमती इंदिरा गांधी यांचे पत्राची नक्कलही मी पाहिली. त्या पत्रात या प्रश्नाचा परिषदेत बौद्धिक विचार काय होईल यापेक्षा परिसंवादास येणारे उद्योगपति यांच्यात आपण शासनाप्रमाणे जनतेलाही जबाबदार आहोत ही जाणीव होणे महत्त्वाचे आहे यावर भर दिला होता. तो योग्यच होता. परंतु विनोबांचे भाषण व तेथील चर्चेची मी ऐकलेली हकीगत पाहता देशापुढे असलेले बिकट प्रश्न सुटण्याच्या दृष्टीने काही निश्चित प्रगती तेथे झाली असे वाटत नाही. सगळ्यांचे बरे व्हावे, व्यवहाराकडे दुर्लक्ष होता कामा नये, शासन, उद्योगपती व जनता सर्वांचे सहकार्य असणे इष्ट आहे; प्रगतीस अवश्य आहे– हे विचार खरे असले तरी आजच्या घटकेस कोणी निश्चित काय करावे व आज होत असलेल्या कोणत्या गोष्टी ताबडतोब थांबल्याच पाहिजे याबद्दल स्पष्टपणे बोलण्याची तयारी असल्या-शिवाय प्रत्यक्ष पाऊल पुढे पडणार नाही– व असे स्पष्टपणे बोलावयाचे तर विशेषतः शासन व उद्योगपती यांचे दोष दाखविण्याची तयारी पाहिजे. तशी मी पाहिलेल्या परिषदेच्या वृत्तांतावरून कोणाचीच दिसली नाही.





शासन व उद्योगपती यांचेकडून माझे मते जो ostentatious wasteful व Irresponsible खर्च होतो तो बंद करणे एवढी एकच गोष्ट जरी सांगितली गेली तरी पुष्कळ कार्यभाग होईल.

सुमारे एक वर्षापूर्वी वर्धा येथेच नयी तालीम पद्धतीच्या पुरस्कर्त्यांची बैठक झाली व तिचे उद्घाटन स्वतः पंतप्रधान इंदिराबाईंनी केले. त्यात स्वातंत्र्योत्तर आजपर्यंत शिक्षणविषयक केलेले प्रयत्न निष्फळ का झाले याचा विचार होऊन गांधी, विनोबा वगैरे नेत्यांनी सुचविलेली शिक्षणपद्धती कार्यवाहीत कशी आणावी याबद्दल मार्गदर्शन केले गेले. प्रत्यक्ष नव्या, फाइव्ह इयर प्लॅनमध्ये सुचविलेल्या शिक्षणव्यवस्थेत त्या' सूचनांचा मागमूसही नाही असे श्रीमन्नारायण यांनी मला सांगितलें ! केंद्र सरकारमध्ये मौलाना आझाद यांचेनंतर शिक्षणखाते हे विशेष महत्त्वाचे नाही तेव्हा ते कोणाकडेही देता येते अशा कल्पनेने आतापर्यंत पाच-सहा मंत्र्यांनी तो कारभार पाहिला. साहजिकच नोकरशाही तयार करील त्या कागदावर सह्या करणे ही प्रथा त्या खात्यात चालू आहे. परंतु ही बाब अत्यंत महत्त्वाची आहे व शिक्षणाचा खेळखंडोबा असाच होत राहिला तर तरुण पिढी पूर्णपणे हातातून जाईल, म्हणून स्वतः पंतप्रधानांनी यात लक्ष घालावे असे मी त्यांना सांगणार आहे असे मला श्रीमन्नारायण म्हणाले व ते आशावादी दिसले. परंतु मला तो आशावाद तितका पटत नाही. कारण झाल्या गोष्टी इंदिराबाईंना नकळत झाल्या असे थोडेच आहे व खरोखर गांधी, विनोबा व इतर काही स्वतंत्र बुद्धीचे पाश्चात्य शिक्षणज्ञ यांना जो मूलभूत बदल पाहिजे तसा तो बहुसंख्य भारतीय सुशिक्षितानाही पाहिजे आहे असे दिसत नाही. कारण मूलभूत विचार करणे किंवा चाकोरीबाहेर जाणे याला लागणारे धैर्य व निष्ठा यांचा अभाव व शासनातील नेत्यांना सत्ता हाती ठेवणे यापेक्षा दुसरे निश्चित काही ध्येय आहे असे प्रत्ययास येत नाही. माझा श्रीमन्नारायण यांशी जो परिचय झाला आहे व त्यांचे ग्रंथ मी वाचले आहेत त्यावरून गांधींचा दृष्टिकोन त्यांना बहुतांशी पटला आहे असे दिसते परंतु जोपर्यंत ते किंवा इतर गांधीवादी मंडळी त्याचे कार्यवाहीकरिता पडेल तो स्वार्थत्याग करून सुप्रतिष्ठांची नाराजी ओढून घ्यावयास तयार नाहीत व जरूर पडल्यास सत्याग्रही, लढा देण्याची त्यांची तयारी नाही तोपर्यंत Pious Intentions यापेक्षा पुढील पायरी त्यास गाठता येणार नाही आणि गांधी जर एक गोष्ट निर्विवाद असेल तर ती ही की He was a man of action-first and last नुसत्या Pious Intentions असणाऱ्यांना त्यांचे अनुयायित्व कधीच कुणाला करता येणार नाही.

आम्हांस कळविलेप्रमाणे आम्ही सेवाग्रामहून निघून २। वाजता पवनार येथे विनोबांचे भेटीकरता पोचलो. विनोबाजी राहतात ते हे स्थान फार रम्य आहे व इमारत व आवार फार आकर्षक आहेत. अगदी पुढेच एक लहानशी इमारत आहे. त्यातल्या शेवटल्या खोलीत विनोबा दुपारची विश्रांती घेत होते. तेथेच त्यांचे कार्यवाह काही काम करीत होते व जवळच्या खोल्यात इतर काही मदतनीस व आश्रमवासी मंडळी वाचन चर्चा करीत होती. तितक्यात Meditation ची घंटा झाली व सुमारे ४०–५० स्त्री-पुरुष विनोबा होते त्या जागी आले. १५ मिनिटे मौनपूर्वक शांतपणे सर्वजण बसल्यानंतर कार्यवाहांनी मुलाखतीस आलेल्या व्यक्तींपैकी ज्यांनी प्रश्न लिहून दिले होते त्यापैकी एकेकांचे नाव घेऊन त्यास पुढे बोलाविले. पहिल्या व्यक्तीचे पत्र थोडे वाचले गेले व विनोबांनी बाकीचा भाग वाचून सारांश सांगितला. पत्र हिंदीत होते. व ग्रामदान झालेल्या ८००० वस्तीच्या एका गावात अद्याप हरिजनांचे व गरिबांचे हाल थांबले नाही. ग्रामदान होऊन १०-१५ वर्षे झाली तरी, तेव्हा काय करावे हे पत्रात विचारले होते. विनोबांनी प्रारंभी व जरा विस्ताराने सांगितले की ४–५ माणसांचा प्रपंच नीट चालवायचा तर उभी हयात खर्च करावी लागते, मग ८००० माणसांचा योगक्षेम सांभाळायचा तर एकच जन्म काय अनेक जन्मही लागणार ! परमार्थाच्या गोष्टी सतत सांगाव्या लागतात. व्यवहाराच्या गोष्टी एकदा सांगितल्याने कार्यभाग होतो. उत्तरात काही मुद्दा आहे हे खरे असले तरी, शब्दशः ते उत्तर व विशेषतः ते ज्या प्रकारे दिले गेले त्यात पत्रलेखकाच्या कळकळीचा योग्य तो आदर दिसला नाही व त्याला राग आला असला तर ते साहजिक होते. दुसरा एक पृच्छक फरेंच तरुण जेराल्ड हा होता. स्वावलंबनाने शिक्षण घेतलेला व शिक्षक असलेला हा मुलगा शांतीदास यांचे लिखाणामुळे गांधीकडे आकर्षित झाला व अरविंदाश्रम वगैरे ठिकाणी जाऊन आश्रमात आता सूत काढायला शिकत होता. अनवाणी चाले, केर काढणे, कपडे धुणे सर्व स्वतः करी. पहाटे ४ व ५॥ च्या प्रार्थनेस व संध्याकाळी ६ चे प्रार्थनेस नियमित हजर असे. एक दिवस बायबलातील काही प्रार्थनाही त्याने म्हटल्या. त्याचे प्रश्नांचे निमित्ताने विनोबा बोलले त्यातील मुख्य भाग असा : ख्रिस्ताची शिकवण अंगी बाणवा. हे उत्तर ठीकच आहे परंतु त्याचे विशिष्ट प्रश्नांना त्यात उत्तर नाही. तू हिंदुस्थानात ६ च महिने राहणार व फरान्समध्ये सर्व जन्म-पण आमचा देश तर तुमचे देशाचे कितीतरी पटीने मोठा मग असे कसे ?

देवाचा संदेश ( Call ) आपणास आला असे केव्हा समजावे याचे उत्तर. तुझे नाव जेराल्ड, तुला तुझी आई ' जेराल्ड, म्हणते ना मग You

are called याचा अर्थ Every one is called असा होऊ शकेल पण तसे समजून सांगितले व योग्य त्या Solemnity ने ते दिले गेले तर. तसे झाले नाही व जेराल्डचे समाधान झाले नाही असे तो मला म्हणाला. याशिवाय Les Miserables तू वाचले आहेस का व तो हो म्हणाल्यावर That is the only book Baba has read in French असे विनोबा म्हणाले. अधिक काही नाही. त्या पुस्तकाचे तात्पर्य व Bible मधील शिकवण एकच आहे असे त्यांना म्हणायचे असेल पण ते म्हणाले नाही व त्यांनी स्वत; ते पुस्तक French मध्ये वाचले हे सांगण्यात स्वारस्य काय हे समजले नाही ! अशी अनेक classics प्रत्येक भाषेत आहेत– व ती सगळी किंवा एकही कोणी थोर मनुष्याने त्या त्या भाषेत वाचलीच पाहिजेत असे थोडेच आहे ? Les Miserable मध्ये जी शिकवण आहे ती बायबलचीच शिकवण व तीच माणसाला जरूर अशी शिकवण हे खरे परंतु हे जर सांगायचे होते तर ते अगदी वेगळ्या पद्धतीने सांगायला हवे होते. विस्तार न करताही ते सांगता आले असते परंतु वक्रोक्ती, किंवा हरदासी विनोद व शब्दच्छल ही अशा प्रसंगी अगदी अयोग्य होत.

पहिल्या पत्रानंतर ताबडतोब माझेच नाव कार्यवाहानी उच्चारले व मी पुढे जाऊन बसलो. विनोबानी मजबद्दल थोडी माहिती सांगून यांनी टिळक व गांधी याचा अभ्यास केला आहे व बरेच प्रश्न विचारले आहेत असा उल्लेख केला. नंतर उत्तर म्हणून ते बोलले त्याचा सारांश असा " मजकडे काही दिवसापूर्वी दिल्ली येथे गांधीची Collected works संपादली जात आहेत त्याबद्दल सल्ला घ्यावयाला ती मंडळी आली होती, त्याना मी सांगितले की गांधीचे स्वतःचे विपुल लिखाण आहे. व त्यांचेवर लिखाणही अमाप होत आहे, जगभर ते ठेवले जात आहे परंतु त्याचेवर बॉम्बही पडताहेत किंवा किंवा पडतील अशी स्थिती आहे तर या अशा खटपटीचा उपयोग काय ? व्यर्थ ते. हेच उत्तर मला प्रस्तुत पत्रालाही देण्यासारखे आहे. " वरील उत्तराने माझी निराशा झाली हे सांगावयास नको. माझ्या पत्रावरून माझी या विषयाची आस्था व मी विचारलेल्या प्रश्नांवरून त्याबद्दल मी केलेला मनःपूर्वक विचार ही दिसून येण्यासारखी आहेत व अशा पत्राला वरील उत्तर अगदी अयोग्य वाटते. स्वतः विनोबानी कितीतरी लिहिले आहे, ते चर्चा करतात, काही महत्वपूर्ण परिसंवादाचे उद्‌घाटन अद्यापही करतात हे तरी ते का करतात ? असा प्रश्न साहजिक-उद्‌भवतो. ' मला प्रश्नांची उत्तरे द्यायला वेळ नाही, सवड नाही ' असे त्यांनी मला कळवले असते तर त्याला कांही अर्थ

होता. विनोबानी दिले असे उत्तर गांधींनी कोणालाही कधी दिले असते अशी कल्पनाही करवत नाही. सामान्य व्यक्तीलाही खरी थोर माणसे व कार्यव्यापृत माणसे असे वागवतात की आपल्याबद्दल त्यांना जिव्हाळा आहे व आपल्या प्रश्नांतील कळकळ समजून घेऊन ते उत्तर देतात असे वाटावे. पाचपन्नास व्यक्ति– त्यातल्या बऱ्याच आपल्या कायमच्या अनुयायांपैकी एके ठिकाणी जमवून असल्या प्रश्नांना उत्तरे द्यायची हेच मुळात चमत्कारिक आहे. विनोबांचे आता वय झाले आहे व त्याना कांही व्याधीही आहेत, तरीही त्यांची प्रकृती किंवा विचार करण्याची शक्तीही शाबूत दिसते म्हणून काही मर्यादेत परंतु सर्वसामान्य माणसास समजेल, उपयोगी पडेल अशा तऱ्हेचे भाषण किंवा लेखन त्याना सहज करता येईल व ते म्हणतात, बोलतात याचा जीवनाशी कांही संबंध आहे असे दाखविण्याचा प्रयत्न करता येईल. आज ते ज्याना सवडीने भेटतात, ज्यांच्याशी बोलतात असे वृत्त येते ती मंडळी मोठी असली तरी त्यांना विनोबांचे किंवा गांधीचे कांही ऐकावयाचे आहे असे त्यांच्या इतर कृतीवरून दिसत नाही, होते एवढेच की विनोबांशी चर्चा केल्यामुळे आम्ही कारभार करतो त्याला विनोबांचाही पाठिंबा आहे असे ते भासवू शकतात !

श्री. विनोबांस ऐकू येत नाही म्हणून मुलाखतीपूर्वी त्यांस टांचण द्यायची सूचना होती. त्याप्रमाणे मी श्री. विनोबांस दिलेले टांचण :

देशांतील इतर अनेकांप्रमाणे मी माझ्या विद्यार्थिदशेपासून आज चाळीस वर्षांवरील काळात गांधीजींचा दृष्टिकोन, शिकवण, कार्य व व्यक्तिमत्त्व याबाबत आस्थापूर्वक मनन, चिंतन, अभ्यास करीत असतो.

माझ्या समजुतीप्रमाणे गांधीजींच्या शिकवणुकीचा मुख्य गाभा Social Thought & Action याबद्दलच्या त्यांच्या भूमिकेत आहे. तिचा माझ्या समजुतीप्रमाणे मथितार्थ असा :

मनुष्य हा सगळीकडे सारखाच असून तो मूलतः सत्प्रवृत्त आहे. म्हणून पुरेसा प्रयत्न केला तर योग्य गोष्टीविषयी त्याचे मन वळविता येते. वैयक्तिक व सामाजिक जीवनाचे ध्येय, मूल्ये व नियम एकच असतात. सर्वोदय हेच प्रत्येक विचारी माणसाचे ध्येय होऊ शकते. सर्वोदय म्हणजे सर्वांचा ( व विशेषतः दलितांचा ) सर्व प्रकारे उदय : साधेपणा व विकेंद्रीकरण ( – सुख-सोयी ही साधने आहेत साध्य नव्हे, सत्ता खालून वर जाणे ) यांचा नीट अर्थ समजून घेऊन त्याचे आचरण झाल्यास सर्वोदय हे साध्य ध्येय आहे हे लक्षात येते.







माझ्या मते ही शिकवण आपल्या देशास व जगासही फार मोलाची आहे. खरे म्हणजे आजचे परिस्थितीत तीशिवाय तरणोपायच नाही.

गांधीचे सत्ताशास्त्र, अध्यात्म, धर्मविषयक भूमिका व मते ही वरील अर्थी नवी नाहीत; व त्यांवरून गांधींचा इतिहासांतील विशिष्ट स्थानाचा उलगडा होत नाही. ती बरोबर नाहीत किंवा महत्त्वाची नाहीत असे नव्हे. गांधींचे जीवन, लिखाण, वक्तव्ये व त्यावरील लिखाण व वक्तव्य यांचा इतका प्रचंड संकीर्ण तपशील आहे की वेळोवेळी अनेक प्रश्न व शंका मनात येतात. त्यांतील काही अशा:

१ गांधींचे अलौकिक आध्यात्मिक, नैतिक जीवन त्यांचे व्यक्तिमत्त्वात असलेल्या मूळ मर्यादांमुळे व त्यांच्या विशिष्ट कार्यक्षेत्रामुळे कांहीसे कृत्रिम व आत्मकेंद्रित झाले आहे. प्रथम श्रेणीच्या अध्यात्मिक जीवनांत हा दोष असू नये व नसतो. याबद्दल आपणास काय वाटते ?

२ अनेक थोर व्यक्तींचे व्यक्तिमत्त्व त्यांची शिकवण व कार्य यापेक्षा थोर असते. गांधींची शिकवण ही त्यांचे व्यक्तिमत्त्वापेक्षा थोर आहे हे विधान बरोबर आहे का ?

३ Means & Ends या चर्चेत व राजकारण हे संताचे कार्यक्षेत्र आहे की नाही याविषयी गांधींची भूमिका ज्याअर्थी बरोबर आहे त्याअर्थी ती त्यांचा वाद झाला त्या टिळकांचे भूमिकेशी विसंगत नाही व ज्या पातळीवरून ती वेगळी आहे त्या पातळीवरून टिळकांची भूमिका तत्वत: अधिक समर्पक व व्यवहारांत अधिक सरळपणाची आहे, असे म्हणता येणार नाही काय ?

४ अलीकडच्या काळांतील गांधींचे अनेक निकटवर्तियांचे मते धर्म-कल्पनेत कांही उणीव आहे व त्याचे ऐवजी ते spirituality चा पुरस्कार करितात. वस्तुत: spirituality या कल्पनेतही दोष संभवतात. गांधींच्या जीवनात धर्मभावना त्यांच्या सर्वांगीण प्रगतीच्या आड न येता सतत तिचा पाया होती. आपल्या मते ही भूमिका योग्य आहे का ?

५ गांधींचे अनुयायी म्हणविणारी (व असणारी) मंडळी सत्ताधारी पक्ष (गांधींचे एकीकडे नांव घेत) ज्या चुका (Bath of planning & of execution) करीत आला आहे त्याचे विरुद्ध सडेतोड मतप्रदर्शन का करीत नाही ? स्वराज्यस्थापनेनंतर अन्याय, व असत्य यांचे प्रतिकाराकरिता त्यांनी सत्याग्रह केला नाही व एका पाठोपाठ एक गांधींचा रचनात्मक कार्यक्रम नाहीसा केलेला पाहिला– मग ते गांधींचे अनुयायी कसे ?

– प्र. रा. दामले

❖ ❖ ❖

## ग्रंथपरिचय—

### विशिष्ट दृष्टिकोणातून वारकरी पंथाचा इतिहास

[ वारकरी संप्रदाय : उदय व विकास. ले. भा. पं. बहिरट व प. ज्ञा. भालेराव प्र. व्हीनस प्रकाशन पुणे पृष्ठे डेमी ३०२ किंमत १५ रुपये ]

वारकरी संप्रदाय हा महाराष्ट्रातील सर्वांत लोकप्रिय धर्मपंथ होय. आषाढी–कार्तिकी एकादशींना पंढरपुरास भरणाऱ्या वाऱ्या आजही पाहिल्यास व ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, तुकोबांची गाथा यांच्या वाचकांची संख्या अजमाविल्यास या विधानाची प्रचीती येण्यासारखी आहे. महाराष्ट्रातील या अतिशय लोकप्रिय धर्मपंथाचा इतिहास वै. सोनोपंत दांडेकर यांनी मागे ज्ञानकोशाच्या निमित्ताने सांगितला होता. त्यानंतर महाराष्ट्रातील धर्म व धर्मपंथ यांच्याविषयी खूप नवे संशोधन झाले. त्याचा उपयोग करून कोणीतरी जाणकाराने वारकरी पंथाचा समग्र इतिहास नव्याने सांगणे अगत्याचे होते. हे महत्त्वाचे कार्य पंढरपूर येथील निष्ठावान संतप्रेमी श्री. भा. पं. बहिरट व प. ज्ञा. भालेराव यांनी एक नवा ग्रंथ लिहून उत्तम रीतीने पार पाडले आहे. श्री. बहिरट यांचा या विषयीचा अभ्यास व व्यासंग चौफेर असून सखोल आहे. संतवाङ्मयाचे बोधरहस्य त्यांना वै. दादामहाराज सातारकरांसारख्या प्रेमभक्तीत तल्लीन झालेल्या सत्पुरुषाकडून प्राप्त झालेले असल्याने त्याच्या खुणा या ग्रंथात पानोपानी प्रकट झाल्या आहेत. भक्तिप्रेमाचा बोध देणारे 'प्रेमबोध' नावाचे एक सुंदर मासिकही आपल्या सहकाऱ्यांबरोबर त्यांनी कित्येक वर्षे चालविले होते. सारांश, वारकरी संप्रदायाचा इतिहास लिहिणाऱ्यास जशी ऐतिहासिक दृष्टी हवी तशीच त्याला बोधदृष्टीचीही आवश्यकता आहे. सुदैवाने बहिरट भालेराव या दोनही दृष्टींचा लाभ झालेला असल्याने त्यांच्या या ग्रंथाचे मोल दुणावले आहे.

वारकरी संप्रदायाचा ऐतिहासिक आढावा तर विस्तृतपणे या पुस्तकात आहेच. पण एका विशिष्ट दृष्टिकोनातून हा आढावा लेखकांनी घेतलेला आहे. पंथाच्या बाहेर असलेले लोक व क्वचितप्रसंगी पंथीय लोकसुद्धा वारकरी संप्रदायाचे रहस्य जाणीत नाहीत अशी लेखकांची तक्रार आहे. 'ज्ञानेशादि संतांचे विशिष्ट दृष्टिकोण बाजूस सारून पूर्वपरंपरागत शांकरवेदान्ताच्या आहारी गेल्यामुळे मोक्ष हेच ध्येय असलेल्या केवलाद्वैताचे विवरण करण्यात वारकरी प्रवचनकार, व कीर्तनकार गुंतलेला' पाहून लेखकांना नवल वाटते. भक्तीला पंचमपुरुषार्थ मानून तिच्यापुढे मोक्ष तुच्छ मानण्याची परंपरा वारकऱ्यांची आहे. या बोधपरंपरेस न जुमानता 'विचारसागर',





'वृत्तिप्रभाकर' वा 'पंचदशी' सारख्या वेदांतग्रंथावर वारकरी प्रवचन करू लागला तर पंथीय हेतू दूर राहील अशी शंका बहिरट-भालेराव यांना आहे. आणि अशी थोडीफार विपरीत दृष्टी सुधारावी म्हणूनच या पंथाच्या इतिहासाचे लेखन झालेले आहे. उगम व इतिहास, तत्त्वज्ञान, आचार, ग्रंथसंपदा, प्रमुख क्षेत्रे इत्यादि प्रकरणांतून ऐतिहासिक आढावा घेताना व तत्त्वचर्चा करताना लेखकांना आपल्या हेतूचा विसर पडलेला नाही.

वारकरी शब्दाचा अर्थ, भक्तराज पुंडलिकाचा काळ, त्याची कामगिरी, विठ्ठल दैवताची प्राचीनता, ज्ञानेश्वर-नामदेवांची कामगिरी, संप्रदायाची स्थापना व संघटना, भानुदास-एकनाथांची कामगिरी, तुकोबा-निळोबा यांचे कार्य इत्यादि अनेक महत्त्वाचे विषय पहिल्या ऐतिहासिक समालोचनेत आलेले आहेत. तत्त्वज्ञान या प्रकरणात परमात्मा व सच्चिदानंदरूपता, शून्यवादाचे खंडण, विज्ञानवाद, देवोदेवी, जगताचे स्वरूप, जीवाचे स्वरूप, भक्तीचे स्वरूप इत्यादि विषयांचे अतिशय मूलगामी व पुष्कळ अंशी स्वतंत्र असे विवेचन दृष्टीस पडते. 'परमात्म्याचा चिन्मय अंश जीव होय. या अंशाचे प्रयोजन काय? परमात्म्यास स्वतःच्या प्रेमाची प्रतीती हे त्याचे प्रयोजन होय, दृश्य जगत् परमेश्वराचे ऐश्वर्य खरे. त्यात प्रभूस स्वानंदाचे दर्शन घडते. पण ज्या प्रेमानंदाने प्रभू अनेक रूपांनी नटला त्या प्रेमानंदाची अनुभूती जगातील पदार्थ घेऊ शकत नाही. तर जीवच चिन्मय असल्याने ती घेऊ शकतो.' (पृ. ८८) असा रूढ परंपरेशी विसंगत वाटणारा पण संतबोधाशी जवळ असणारा तत्त्वविचार लेखक मांडतात तो पटणारा आहे. श्री विठ्ठलाविषयी वारकऱ्यास वाटणारे प्रेम, तुलसीमाला, गोपीचंदनाची मुद्रा, आळंदी-पंढरीची वारी, भजन कीर्तन, नामस्मरण, सत्संगती, दैनंदिन व्यवहार व नित्यक्रम अशा आचारधर्माचेही विवेचन संतवाणीचा आधार देऊन केलेले असल्याने महत्त्वाचे आहे. वारकरी संप्रदायाची ग्रंथसंपदा व प्रसिद्ध क्षेत्रे यांवरील चर्चाही वाचनीय व माहितीपूर्ण आहे. प्रमुख फड व पालख्या यांचा तपशीलवार वृत्तांत मोठा उद्बोधक असून त्यावरून या पंथाची महाराष्ट्रातील लोकप्रियता दिसून येते.

महाराष्ट्रात नाथ, महानुभाव, दत्तात्रेय, रामदासी इत्यादि अनेक उपासना पंथ असताना वारकरी संप्रदायच लोकप्रिय का झाला? या प्रश्नाचे उत्तर लेखकांनी या पंथाची इतर पथांशी केलेल्या तुलनेतून मिळण्यासारखे आहे. इतर पंथ व वारकरी पंथ यात दृष्टिकोणाचा मूलभूत फरक

अनुक्रमणिका

असल्याचे लेखक आवर्जून सांगतात. रामदासी पंथ व दत्तोपासनेचा पंथ यांच्यापेक्षा वारकरी पंथ अधिक उदार दृष्टीचा व सर्वसंग्राहक आहे या मताच्या पुष्टीसाठी लेखकांनी दिलेली प्रमाणे बिनतोड आहेत. सोवळेओवळे, व्रतेवैकल्ये, कर्मठपणा यांचा श्रीअप्रबुद्धांसारख्यांनी कितीजरी पुरस्कार केला तरी तो लेखकांना मान्य होण्यासारखा नाही. मंत्र, तंत्र, यंत्र, नवससायास, चमत्कारिक सिद्धी यांपासून वारकरी पंथास संतपुरुषे पूर्णपणे अलिप्त असल्याचे लेखकांनी सावधपणे हेरले आहे. शेवटच्या प्रकरणात वारकरी संप्रदायाची धार्मिक, सामाजिक व वाङमयीन कामगिरी वर्णून लेखकांनी आपल्या विषयाचा समारोप केला आहे.

सर्वच विवेचन विशिष्ट दृष्टिकोणातून असले तरी तो दृष्टिकोण संतबोधास धरून असल्याने ते पटण्यासारखे आहे. लेखकांची भाषा साधी, सरळ व अनलंकृत असल्याने जिवंत वाटते. वारकरी संप्रदायाच्या विकासाचे सूत्र दाखविताना काही महत्त्वाच्या नव्या मुद्यांची चर्चा झाली असती तर ठीक झाले असते. वारकरी संप्रदाय, त्याचे दैवत विठ्ठल व त्याचा भक्तिमार्ग यांच्या उदय–विकासात आर्येतर परंपरेचा फार मोठा वाटा आहे. असे जे नवे संशोधन आज होत राहिले आहे त्याचा परामर्श श्री. बहिरट– भाले-राव यानी ध्यावयास हवा होता. मूर्तिपूजा, सगुणोपासना, मंदिरे, उपवास इत्यादी मूल्यांची देणगी जैन बौद्धादि श्रमणांनी भागवत धर्मास दिली हे खरे काय ? पौराणिक काळात जो भागवत धर्म वाढला त्यात वैदिक मूल्ये किती टिकून राहिली ? अवैदिक अथवा आर्येतर धागे किती जुळून गेले. यासंबंधी विवेचन या ग्रंथात येणे आवश्यक होते. मुसलमानी अमदानीत जनार्दन-स्वामी– भानुदास– एकनाथ यांनी वारकरी पंथाची पुनर्घटना केली हे खरे पण या पडत्या काळात चांगा मुधेशांनी पंढरपूरच्या देवस्थानांचे रक्षण बादशहाचा हुकूम घेऊन केले या महत्त्वाच्या ऐतिहासिक घटनेची नोंद लेखक का घेत नाहीत ? वारकरी संप्रदायाचे दैवत जे श्रीविठ्ठल त्याची उपासना वाढावी म्हणून हजारो विठ्ठलमंदिरे बांधणाऱ्या ज्योतिपंथ महाभागवताचे विस्मरण लेक्षकांना का झाले ? असे काही प्रश्न एवढ्यासाठीच उपस्थित केले आहेत की पुढील आवृत्तीच्या वेळी लेखकांनी आपले हे महत्वाचे पुस्तक सर्व अंगांनी पूर्ण करण्याचा प्रयत्न करावा. एरवी आहे या स्वरूपातही मराठी वाचक आपल्या आवडत्या धर्मपंथाच्या इतिहासावरील या ग्रंथाचें स्वागत करतीलच.

–डॉ. प्र. न. जोशी

अनुक्रमणिका

# श्री सत्तान्तर पुराणे–चतुर्थोऽध्यायः*

बंगाली दुष्काळ आणि नवी व्हाइसराई अशा दोन मुख्य घटना ह्या खंडात येत असल्या तरी महात्मा गांधींविषयी राजकारणी मुत्सद्यांना सारखी काळजी वाटत होती, तिचे चित्र ह्या सर्व पत्रव्यवहारात स्पष्ट दिसते. ब्रिटिशांना जळी स्थळी, काष्ठी, पाषाणी सर्वत्र गांधी जसे काही भेडसावत होते– असे वाटते. कारण गांधीसंबंधी कितीतरी मते ह्या खंडात व्यक्त झाली आहेत; कितीतरी जणांनी आहूत–अनाहूत सल्ला दिलेला आहे. त्या सर्व मसलतींचे सार एवढेच निघते की गांधीजींच्या थोरपणाची काडी इतकीही कल्पना खुद्द चर्चिलपासून खालपर्यंत कुठल्याही ब्रिटिश अधिकाऱ्याला झाली नव्हती. किंबहुना आपल्या सत्तेची ही शेवटची घटका चालू आहे, आणि स्वतंत्र भारत उदयाचलावर येत आहे. याची चाहूल देखील दूरदृष्टीच्या नामांकित मुत्सद्द्यांना लागली नाही. असो.

सत्तान्तराची सुरुवात ह्या लष्करी व्हाइसरायापासून झाली असे म्हणता येते. कारण वेव्हेलची नेमणूक नेहमीप्रमाणे पांच वर्षांची नसून अवघ्या तीन वर्षांची होती. पूर्वेकडील आघाड्यांवर विशेषतः ब्रह्मदेशांतील लढाई जिंकण्यासाठी सर्व तयारी हिंदुस्थानातून व्हावयाची होती. अमेरिकन सैन्य आणि सामग्री यद्यपि येत असली तरी त्यांची वाटणी– रवानगी भारतीय भूमीवरून होणार असल्याने लष्करी दृष्टीचा व्हाइसरॉय नेमण्यात औचित्य असावे. पण लढाई संपत आली असल्याचा आणि लढाईनंतर कांही तरी राजकीय सुधारणांचा हप्ता देण्याची निकड असल्याचा पुरावा वेव्हेलच्या त्रिवार्षिक नेमणुकीत आढळतो. मात्र लढाईच्या तयारीपेक्षा नव्या व्हाइसरायांना

---

* ट्रान्स्फर ऑफ पॉवर १९४२–७ ( १५ जून १९४३ ते ३१ ऑगस्ट १९४३ )

सं. डॉ. मान्सर्ग आणि लुंबी; राणी सरकारचे प्रकाशन लंडन. पृ. १२९५ किं. १३ पौंड.

ब्रिटिश इन्फर्मेशन सर्व्हिसेसच्या शाखात मिळणारे पुस्तक.

बंगालमधील कारभार सुधारण्यासाठी लष्करी अधिकाऱ्यांची भरपूर मदत घ्यावी लागली आणि दुष्काळी परिस्थितीवर मात करावी लागली.

परंतु वेव्हेलसारख्या लष्करी अधिकाऱ्याची दिल्लीस पाठवणी करताना लंडनहून त्यांना उपदेश पाथेय पुष्कळ मिळाले. त्यातील ब्रिटिश युद्धमंत्र्याकडील पुरचुंडी फार चुरचुरीत वाटली: तीत त्यांनी कानमंत्र दिला होता–

> "गेल्या २५ वर्षांच्या इतिहासाच्या अभ्यासावरून माझे निश्चित मत असे बनले आहे की हिंदुस्थानबाबत काही समझोता– गांधी जिवंत आहेत तोपर्यंत अगदी अशक्य आहे." (पृ. ३६९)
>
> सर जेम्स ग्रिग यांचे हे मत होते. दुसरे सर हेन्री क्राफ्ट, संरक्षण खात्याकडील सल्लागार यांनी बजावले की– "गांधीना नसते महत्त्व देऊन त्यांचा बडेजाव माजवू नका."

कारण गांधींची फट् फजिती आपणाकरवी घडवून आणण्यात दैवी मदत आपणास लाभली. ऐन मोक्याच्या प्रसंगी भारतभर गोंधळ माजविण्याचे गांधींचे प्रयत्न निष्फळ झाले. (पृ. ३७४)

भारतात उत्तरप्रदेशचे गव्हर्नर सर मारिस हेलेट होते. त्यांनी व्हाइसरॉयना मोफत सल्ला पुरविला : सर फिलिप चेटवुडचे मत असे होते की गांधी म्हणजे गाडाभर माकडांइतका कावेबाज माणूस! (कनिंग अॅज ए कार्टलोड ऑफ मंकीज्) पृ. १०२८

पण गांधींबद्दल इतरही अनेक प्रश्न सरकारपुढे होते. आगाखान पॅलेसमध्ये त्यांना ठेवण्यापेक्षा त्यांना कोठे हलवावे काय, अहमदनगरच्या किल्ल्यात त्यांना न्यावे का, इत्यादी विचारांचा खल चालू असतांना ते आजारी झाले. त्यांची प्रकृति सरकारी सर्जन– जनरलनी तपासली; कलकत्त्याचे डॉ. बिधनचंद्र रॉयही आणले. उभयतांच्या मते गांधींचा आजार धोक्याचा ठरला. म्हणून व्हाइसरॉयनी त्यांची सुटका केली. तेव्हा ते आता नवा डाव कोणता टाकतील, इकडे सरकारी हेरांचे व दूतांचे लक्ष होते. त्यात एका पत्रात निर्देश आढळला की डॉ. बिधनचंद्र रॉयनी गांधीजींच्या तब्येतीबद्दल तसा रिपोर्ट लिहिला कारण "मुंबई सरकारच्या शासकाचा आग्रह." आता मुंबई सरकारतर्फे एच्. व्ही. आर. आयंगारच त्यांजबरोबर होते. त्यांनी असा आग्रह धरला नाही असे गव्हर्नरांनी स्पष्टपणे लिहिले. तेव्हा डॉ. बिधनचंद्र रॉय लबाड ठरले!! परंतु हा सारा कल्पनेचा खेळ पोष्टात सापडलेल्या एका खाजगी पत्रांतील मजकुरावर आधारलेला! तिसऱ्या अध्यायांत गांधींच्या उपवासात त्यांना कुणीतरी मोसंबी

रस अथवा ग्लूकोस पाजला असावा असा तर्क निघाला. आणि ह्या पुण्य कृत्याची जबाबदारी डॉ. सुशीला नायरवर येऊन पडली. या वेळी गांधीजींच्या सुटकेस कारणीभूत असा ( अवास्तव ) रिपोर्ट लिहिल्याचे निमित्त मिळाले आणि डॉ. बिधनचंद्र रॉयवर लबाडीचा आरोप ठेवता आला." मिळून काय तर सत्तांतर पुराणांतर्गत गांधी माहात्म्य सजविण्यात महात्माजींच्या कट्टर विरोधकांनाही हात भार लावता आला."

एवढ्या उताऱ्यांवरून गांधींचे भूत ब्रिटिश अधिकाऱ्यांना किती भेडसावीत होते याची कल्पना येते. पण गांधींचे पत्र आले त्याला व्हाइसरायांनी उत्तर काय लिहावे याबद्दल किती ब्रिटिश मुत्सद्यांनी आपली अक्कल लढविली–आणि मसुद्यात किती वेळा "फेर फार" सुचविले किती तारा लंडन दिल्ली-मध्ये खडखडल्या . . . हा प्रकार पाहिला म्हणजे हसू येते ! ! पण वेव्हेल पडला शिपाई गडी. तुमचा निर्णय लवकर काही लागत नाही. मी पत्राचे उत्तर देणे तहकूब करणार नाही. तुमचा मुद्दा माझ्या लक्षांत आला . . . असे म्हणून त्याने उत्तर दिले. त्याबद्दल गहजब झाला . . . आणि हा सर्व प्रकार केव्हां ? तर फरान्समध्ये आघाडी उघडण्यासाठी दोस्तांची तयारी चालू होती–चर्चिल इंग्लंडमध्ये नव्हते तेव्हांचा ! नं. ६२० ते ६६० पर्यंतचा पत्रव्यवहार गांधींना पाठवावयाच्या उत्तराबद्दल– मसुद्याबद्दल आहे ( पृ. ११४९–११९९ ) शब्दांबद्दल अशी घासाघीस ब्रिटिश मुत्सद्दीदेखील घालतात म्हणायचे ! !

दुष्काळामुळे भासणारी धान्य टंचाई दूर करण्यासाठी केलेली व्हाइसरायांची धडपड– हे ह्या पत्रव्यवहारातले मोठे प्रकरण. ब्रह्मदेशमधील भात येईनासा झाला– अमेरिकन– ब्रिटिश आणि हिंदी फौजांची गर्दी हिंदुस्थानात ब्रह्मदेशमुक्तीसाठी झाली होती. त्यांना भरपूर रेशन द्यावे लागे– अशा दुहेरी कारणांमुळे टंचाई भासू लागली. पीकही कमी आले होते. परदेशातून धान्य मिळविणे ही पहिली अडचण आणि दुसरी– त्या धान्यासाठी– ते आणण्यासाठी जहाजे मिळविणे. वेव्हेलनी याबाबत केलेली खटपट भगीरथ प्रयत्नासारखीच म्हटली पाहिजे. हा सारा पत्र– तारा– व्यवहार पाहिला म्हणजे शासकीय दक्षतेची खरी कल्पना येते. त्यामानाने आमचे सध्याचे शासक– त्यांची एत्संबधीची खटपट– यांची तुलना सहज होते. आणि खेद वाटतो की परदेशी, परधर्मी शासन अधिक जबाबदारीने वागत होते. त्याच्या दशांश जबाबदारी स्वदेशी, स्वतंत्र, स्वधर्मी शासकांची दिसत नाही! ! असे म्हणणे अवास्तव वाटेल; आत्मनिंदेचाही भाग त्यांत कुणाला दिसेल. पण प्रत्यक्ष पत्रव्यवहाराचे आलोडन केल्यावर माझ्या म्हणण्याचे प्रत्यंतर मिळेल.

अशा पत्रव्यवहारांतला मोहक भाग म्हणजे निरनिराळ्या व्यक्तींबद्दल व्यक्त झालेली वरिष्ठांची मते. व्हाइसरॉयना आपल्या सल्लागारांची निवड करायची होती. नवे मंत्रिमंडळ बनविताना मंत्र्यांची निवड: इंग्लंड, कॅनडा ऑस्ट्रेलिया... अशा ठिकाणी भारतीय प्रतिनिधी धाडावयाचे, त्यांची निवड; फायनॅन्स सेक्रेटरी (फडणिस), होम सेक्रेटरी, निवृत्त होणार, त्यांची जागा कुणी घ्यावी ... इत्यादि अनेक निवडी करावयाच्या होत्या. त्याबाबत दिल्ली- लंडन यांच्यात सल्ला मसलत चाले. त्या लांब चऱ्हाटाचे सार एवढे की लायक हिंदी माणसे मिळत नाहीत. हिंदीकरणाचा प्रयोग जवळ जवळ फसला! अशा वेळी कुणाच्या अंगचे गुण प्रकर्षाने दिसले तर कुणाचे दोषच तेवढे नजरेत भरले ह्यापैकी काही नोंदी अशा ....

—अणे प्रामाणिक आणि कळकळीचे आहेत. समझोता व्हावा असे त्यांना मनापासून वाटते. कॉंग्रेसपक्षीयाशी शिष्टाई करण्यास त्यांचा मला उपयोग होईल ××× सप्रू आणि जयकर यांचा प्रचलित राजकारणावर प्रभाव उरला नाही. क. मा. मुन्शीबद्दल कॉलव्हिलचे मत चांगले होते खरे, पण मला ते "हलके फूल" (लाईट वेट) दिसतात.... महाराज सिंगांचे वजन फारसे उरले नाही. काही विधायक कार्यक्रमही त्यांना सुचत नाही. डॉ. आंबेडकरांना डिप्रेस्ड वर्गात थोडे अनुयायी आहेत. पण त्याचे वजन इतरत्र नाही. मानवेंद्र नाथ रॉय यांच्या इतके वजनदारचारित्र्य इतर कुणांत नाही. ते पुढे मागे पक्षनेते होतील पण त्यांना "आश्रय" दिला पाहिजे ....(रॅंगलर) परांजपे बुदबळे आणि बिलियर्ड छान खेळतात.... खिजर हयातखान तिवाना यांच्यात राजकारणाला आवश्यक अशी चिकाटी नाही. सर फिरोजखान नून हे भाषणे दणकावतात, पण काय बोलावयाचे आहे, याचे भान त्यांना रहात नाही ...

अशा प्रकारची वर्णने ब्रिटिश शासकांचीही आहेत. पण आपणास त्यांच्याशी फारसे कर्तव्य नाही. विशेषत: चर्चिलच्या वैशिष्टयांबद्दल एमरी आणि वेव्हेल वारंवार लिहितात. एप्रिल १९४४ मध्ये मुंबईच्या गोदीत भयंकर स्फोट झाला त्यात झालेली हानी वेव्हेलनी लंडनला कळविली ती :—

| | |
|---|---|
| मृत्यु | ५०० |
| जखमी | २००० |
| बेघर | २०,००० |
| जहाज हानी | ७०,००० टन |
| धान्य नाश | ४०,००० ,, |

–तरीदेखील मुंबईकरांचे धारिष्ट प्रशंसनीय आहे. अग्निशामक दलांची मर्दुमकी उत्कृष्ट ठरली... अशी सर्टिफिकिटे व्हाइसरायांनी दिली आहेत (पृ. ९२५).

* * * *

कायदेभंगाची चळवळ चालते कशी याबद्दल शासनाला कुतूहल वाटले आणि आपल्या गुप्तचर खात्यांकरवी कसून शोध चालविला. या चळवळीला पैसा कुठून मिळतो? हा मुख्य प्रश्न. मोठमोठे कारखानदार व्यापारी काँग्रेसला पैसे पुरवितात अशी कुणकुण अधिकाऱ्यांच्या कानी गेली. म्हणून मुंबई–कलकत्ता अशा ठिकाणी बारकाईने चौकशी आरंभिली. तेव्हा आढळले की भूमिगत चळवळीला मोठ्या धंदेवाइकांचा पाठिंबा आहे.. स्वदेशी चळवळीमुळे निघालेले कारखाने आणि स्वराज्यानंतर चलती होईल असे धंदेवाईक हे दोघेही काँग्रेस चळवळीला छुपी मदत करतात, यात नवल नाही. अहमदाबादेतील गिरणीवाले, खुद्द बिर्लाशेट आणि इतर यांच्या मुलाखतीवरून निष्कर्ष काढला आहे की धंदेवाईक बोलून चालून पैसा कमावण्यासाठी धडपडतात. चालू सत्ताधारी म्हणून ब्रिटिशांबद्दल त्यांना आदर वाटतो; तसाच आदर काँग्रेसबद्दल त्यांचा आहे. कारण भविष्यकालांतले सत्ताधारी ते बनतील. आतांपासून त्यांचा अनुनय चालू ठेवला म्हणजे पुढील काळी पंचाईत पडणार नाही.

एतत्संबंधी ब्रिटिश पोलिस खात्यांनी जमविलेली माहिती आणि तिच्या आधारे वरिष्ठ शासकांनी काढलेली अनुमाने कौतुकास्पद वाटतात. हे पत्र. नं. ४०४ ( गुप्तपोलिसी रपोट ) मुद्दाम वाचण्यासारखे आहे. ( पृ. ७६५-७२) त्यांत जयप्रकाश नारायण, अच्युत पटवर्धन अशांची मते उद्धृत केली आहेत. सरदार पटेल, गांधीजी, जवाहरलाल अशांच्या मतांची छाननी आहे. बिर्लांच्या मुलाखतीचा आधार घेतला आहे. रशिया व जर्मनी या देशातील राजकीय चळवळीत तत्रस्थ धनिकांच्या सहाय्याचा उल्लेख आहे आणि हिंदुस्थानात हे धंदेवाईक काय करतील याचा कल्पनिक आराखडा दिला आहे. "यदा-कदाचित् बऱ्याच काळानंतर काँग्रेसचे वर्चस्व येथील राज्यकारभारात राहिले, तर ह्या ( उपकारा ) ची विस्मृति होणार नाही" असा आशावाद व्यक्त झाला आहे. राजकारण आणि पैसा यांची सांगड परस्पर उत्कर्षासाठी येथे हिंदुस्थानांतही ( इतरत्र असते तशी ) आढळते : राजकारण्यांना आपल्या कार्यासाठी पैसा हवा असतो आणि धंदेवाइकांना भावी कालात अमाप फायदा

अनुक्रमणिका

मिळविण्याची आशा असते (काँग्रेस सत्ताधारी झाल्यावर). (पृ. ७७२)
–ही भविष्यवाणी किती तंतोतंत खरी ठरली आहे बरे?

ब्रिटिश पोलिसांनी ही माहिती मिळविली खरी; पण त्यांना आपण होऊन माहिती पुरविणारे स्वयंसेवकही लाभले. राम स्वरूप शर्मा याने सांगितलेले तपशील पोलिसांना विश्वसनीय वाटले. "धंदेवाइकांनी यावेळी ब्रिटिश सरकारकडून लढाईतली कंत्राटे मिळवावी; पैसा कमवावा आणि तो मग काँग्रेसला चळवळीसाठी द्यावा" असे ठरलेले होते, असे शर्मांचे म्हणणे (पृ. ७६८)

बंगाली दुष्काळामुळे झालेले अनर्थ वेगवेगळ्या प्रकारे शासकीय व्यवहारात नमूद आहेत. एक तर गुन्हेगारीची सरासरी एकदम वाढली. लढाईमुळे उद्भव-लेल्या सामाजिक अस्थैर्याचा हा परिणाम असावा. तुलनेसाठी स. १९३३–३७ या सालातील सरासरीच्या मानाने गुन्हेगारीत वाढ किती प्रमाणात झाली त्या वाढीचा तक्ता :-

टक्के वाढ– स. १९३३-३७ च्या सरासरीपेक्षा

| प्रकार १९४३ | अखिल भारतीय | मुंबई इ. | ओरिसा |
|---|---|---|---|
| खून | + ४० टक्के | + १६२ टक्के | + ५८ टक्के |
| डाके–हल्ले | + ४०२ ,, | + ८६५ ,, | + २५१० ,, |
| लूटमारी | + ६२ ,, | + २३१ ,, | + १६२ ,, |
| घरफोडी | + ३२ ,, | + १६६ ,, | + १५० ,, |

(पृ. ९७३)

एकंदर मृत्यूंची वाढ अशीच डोळ्यात भरणारी आहे. स. १९३८-४२ या सालातील सरासरीच्या मानाने स. १९४३ च्या शेवटच्या सहामाहीत अधिक मृत्यू ६७८३१० होते ! ही दुष्काळाला बळी पडलेल्यांची संख्या होय; मलेरिया, कॉलरा व देवी अशा तिन्ही रोगांमुळे दगावलेल्यांत ही वाढ झाली असे दिसते. उपाशी पोटांमुळे ह्या रोगांचे फावले, अशी कारणपरंपरा दिसते. (पृ. ७८८)

राजकारणी गुंतागुंतीच्या ह्या कागदपत्रात कित्येक पुस्तकपरीक्षणे आढळतात, कविता-समित्या काढून लोकांत काव्याची गोडी वाढविण्याच्या योजना कळतात आणि इतरही अवांतर "साहित्यिक" चर्चा वाचावयास मिळते. इतकी मोठी, लांबलचक पत्रे दर आठवड्यास लिहिणारे व्हाइसराय किंवा लंडनमधील स्टेट सेक्रेटरी हे केवढे थोर कलमबहाद्दर असले पाहिजेत याची कल्पना येते. अशी कलमबहाद्दरी आमच्यापैकी कितीजणांना साधेल याबद्दल

शंका वाटते. वेव्हेल फील्डमार्शल खरे; पण त्यांनी "इतरे जन-पुष्पे"* संपादिली होती; त्याला सुंदर प्रस्तावना लिहिली होती. तिजबद्दल लिहिताना एमरींनी आपले काव्य-प्रेम व्यक्त केले ते असे :

> झोप येत नसेल तेव्हा किंवा व्याधिग्रस्ततेमुळे अस्वस्थ वाटते तेव्हा, अथवा तात्कालिक अडचणींमुळे त्रस्त असताना स्वतःशीच कविता गुणगुणण्याने वेळ छान जातो. इंग्रजी काव्याचे नेमके शब्द मला आठवत नाहीत परंतु इतर भाषांतील काव्याचे तसे नाही. इंग्रजी पेक्षा दहा पट तरी ग्रीक व लाटिन अवतरणे मी सहज सांगेन. फार काय, जर्मन, फ्रेंच व इटालियन काव्यातील अधून मधून उतारे देता येतील. आणि थोडे रशियन, युगोस्लाव आणि फार्सीसुद्धा आठवेल." (पृ. ७५६)

इतक्या भाषांतील कविता वाचणारा आधी दुर्मीळ म्हटला पाहिजे; त्याची आठवण राखणारांची तर खास तारीफच केली पाहिजे. इतके बहुभाषी एमरी होते. त्यांनी आणि व्हाइसरॉय यांनी मिळून ठरविले की ब्रिटिश कौंसिलचे कार्य हिंदुस्थानात सुरू झाले तर 'कविता-समित्या' स्थापन करण्यात त्यांनी पुढाकार घ्यावा. तत्पूर्वी "पोएट्री रिव्हयू" संबंधी लिहिताना एमरींनी हैदराबादेतील कवितासमितीचा निर्देश केला; जातीजातीत, भिन्न-धर्मीयात सलोखा नांदण्यासाठी अशा समित्यांचा उपयोग होईल असे म्हटले आणि तत्त्वज्ञान सभादेखील ठिकठिकाणी स्थापन झाल्या तर त्यांचे काम "भारतीयां"ना विशेष मानवेल असा आपला अभिप्राय लिहिला होता. (पृ. ६५७) बीव्हर्ली निकोलसने 'व्हर्डिक्ट ऑन इंडिया' हे पुस्तक लिहिले, त्याबद्दल वेव्हेल आणि एमरी या दोघांचेही अभिप्राय व्यक्त झाले आहेत. गुणवत्तेने पाहिले तर मिस मेयोचा सख्खा भाऊ शोभेल असा हा निकोल्स व त्याचे पुस्तक. एमरीपेक्षा वेव्हेलची प्रतिक्रिया महत्वाची वाटते. "ह्या पुस्तकाच्या आयातीवर बंदी घालता येईल काय" याबद्दल त्यांनी चौकशी आरंभली देखील ! वास्तविक हिंदुस्थान सरकारचा त्याच्याशी कांही संबंध नसता लोकांचा नसता संशय बळावेल; सरकारने हे पुस्तक मुद्दाम लिहवून घेतले असे लोक म्हणतील....इत्यादी ती रास्त भीती व्हाइसरॉयांना वाटली. परंतु निकोल्सचे वर्णन त्यांनी छान केले: "कुंवारी मावशी (=मेडन आँट) प्रमाणे तो बडबडतो- आणि भरकटतो देखील." (पृ. १२२९)

---

* "अदर पीपल्स फ्लॉवर्स" (काव्य संग्रह) लंडन १९४४

तत्पूर्वी एमरींचा अभिप्राय व्यक्त झाला होता. गांधीजी, कॉंग्रेस यांजवरील टीका त्यांना आवडली. "तुम्ही, मी म्हणत आलो तेच निकोलसने अलंकारी भाषेत म्हटले." पण त्याने हिंदूधर्माची आमूलाग्र निंदा केली ते एमरींनाही आवडले नाही. "चालू जमान्यातील कला, संगीत– पत्रपांडित्य कशांतही त्याला एकदेखील गुणलेश आढळला नाही" ही त्याची विकृत दृष्टि एमरींनी ओळखली. मिस मेयोच्या "मदर इंडिया" प्रमाणे याही पुस्तकामुळे भारतभर खळबळ माजेल असे त्यांनी म्हटले (पृ. १२०७).

आणखी एका पुस्तकावर उभय मुत्सद्यांचे अधिक सविस्तर अभिप्राय व्यक्त झाले आहेत. ते पुस्तक म्हणजे पेंडेरेल मून यांचे "स्ट्रेंजर्स इन इंडिया." मून हे हुषार आय्. सी. एस्. होते. सरकारी नोकरीत त्यांनी चांगली कामगिरी बजावली होती सुमारे १५ वर्षे अधिकार गाजविल्यावर त्यांना राजिनामा द्यावा लागला होता. परंतु स्वराज्योत्तर काळात योजना–कमिशन-साठी त्यांना मुद्दाम बोलाविले होते. बरीच वर्षे काम केल्यावर ते निवृत्त झाले. आणि सत्तान्तर पुराणाचे दुय्यम संपादक इ. डब्लू आर लुंबी यांच्या निधनानंतर, त्यांच्या जागी सध्या मून काम करीत आहेत. हा अलीकडील इतिहास झाला. पण त्यांचे पुस्तक वाचून एमरींनी दीर्घ अभिप्राय लिहिला (पृ. १०२४–२५). वेव्हेलांचा अभिप्रायदेखील तितकाच लांब आणि विस्तृत आहे. (पृ. १२६३–६५) परंतु एमरींच्या अभिप्रायावर व्हाइसरॉयांची निरीक्षणे स्वदस्तुरची आहेत ती पहाता वेव्हेलना ते पुस्तक–त्यांतील प्रतिपादन आवडलेले दिसते. मूनने आपला हेतु प्रकट केला. हिंदुस्थानचा कारभार सुधारावा कसा? आणि उपाय सुचविले. त्यांत एक सूचना होती. व्हाइट हाऊस" चा संबंध तोडून टाकावा ही सूचना वेव्हेलना विशेष मान्य होती. तेव्हा मून हे निकोल्ससारखे कांही बाही भरकटणारे नव्हते. त्यांचे लिहिणे म्हणजे अनुभवाचे खडे तात्त्विक बोल होते. एवढे स्पष्ट दिसते. मून यांचा आय. सी. एस. मधील राजिनामा पुस्तकप्रकाशन वर्षीच दिलेला दिसतो. (स. १९४४) तेव्हा पुस्तक प्रतिपादन आणि राजिनामा यांचा कांही संबंध आहे का? असो.

"टायगर किल्स" * हे सरकारी प्रकाशन ब्रिटिश आणि हिंदी लढवय्यांच्या आफ्रिकेतील मर्दुमकी त्यांत सांगितल्या आहेत. प्रस्तावना हिंदी सेनानी औचिन्लेक यांची. तरी एमरींना ते आवडले नाही. निराशा-

* राजेसरकारचे प्रकाशन स. १९४४

जनक वाटले म्हणून त्यांनी आपली जुनी शिफारस पुनः नव्या व्हाइसरॉयांना कळविली." एरिक लिंकलेटर (सारख्या प्रख्यात लेखकाला) ह्या मर्दुमकींचा साद्यंत इतिहास लिहायला का बोलावीत नाही? असा त्यांचा सवाल आहे. (पृ. ९८९)

हिंदुस्थानांतली "छोडो भारत" ही चळवळ बहुतेक थंडावत आली असली तरी तिचा प्रभाव वेव्हेल यांना जाणवल्यावाचून राहिला नाही. त्यावरून त्यांना आपल्या विद्यार्थी जीवनाची आठवण झाली. एमरींशी एतत्संबंधी बोलणे झालें होते त्याला उजाळा मिळाला आणि त्यांनी एमरींना विचारलें: "छोडो ब्रिटन" बद्दल माहिती देणारे एकादे पुस्तक वाचावेसें वाटते सुचवाल का? (पृ. ७३४)* रोमन लोकांनी ब्रिटनचा त्याग केला. तो प्राचीन प्रसंग ह्या पुस्तकात वर्णिला आहे.

* * * *

धान्य आयात करण्यासाठी धडपड हे तर ह्या खंडाचे मुख्य प्रकरण आहे. धान्य मिळाले तरी त्यासाठी आवश्यक तेवढी वाहतूकसाधने (जहाजे) उपलब्ध होत नव्हती आणि त्यासाठी देखील पुष्कळ खटपट करावी लागली. हे सर्व नाजूक असूनदेखील ५००० हाज यात्रेकरूंची सोय व्हावी म्हणून आगबोटी पुरविण्याचा, त्यांना जरूर तेवढा संरक्षक काफिला (कॉनव्हॉय) मिळविण्याचा, आग्रह वेव्हेल धरतात, तेव्हां त्यांचे इस्लाम प्रेम वाखाणावे कां मुस्लीम मतानुनयाचे कौतुक करावे, हे कळत नाही. नोव्हेंबरमध्ये येणाऱ्या हंगामासाठी मे महिन्यापासून वेव्हेल तयारीला लागले, दोन बोटींनी मिळून चारखेपा कराव्या. पांच हजार यात्रेकरू न्यावे-आणावे, अशी योजना त्यांनी सुचविली. त्यांना प्रभू पैगंबराने दृष्टान्त तर दिला नव्हता ना? (पृ. ९४२).

अमेरिकन-ब्रिटिश संबंधाची एक चुणुक ह्या पत्रव्यवहारात आढळते ती ब्रिटिश अहंकाराची द्योतक समजावी. धान्य मिळविण्याबाबत, ते पुरविण्यासाठी आगबोटी पुरविण्याबाबत.... खुद्द चर्चिलनी अमेरिकन प्रेसिडेंटचा चालविलेला

---

* एमरींनी दोन पुस्तके सुचविली: १) कॉलिंगवुड आणि मायर्स कृत रोमन ब्रिटन अँड इंग्लिश सेटलमेंटस् (लंडन १९३७) आणि २) शेल्डनकृत टॅन्झिशन फरॉम रोमन ब्रिटन टु ख्रिश्चन इंग्लंड (लंडन ??) पृ. ८३४

अनुनय पाहून थोडेसे हसू येते. ब्रह्मदेशांतल्या मोहिमेसाठी चुंकिगला सामग्री पुरविण्यासाठी हिंदुस्थानात तळ उभारावे लागतील, तेव्हा हिंदी लोकमत आपणांस अनुकूल असावे, निदान प्रतिकूल नसावें, असे अमेरिकन मुत्सद्दी, सेनानी, पत्रपंडित सुचवीत, ते ब्रिटिशांना आवडत नसे. आणि आता पहावे तो चर्चिल लिहितातः–

> "जपानविरुद्ध आपली संयुक्त मोहिम आखतांना हिंदुस्थानांत समाधान नांदले पाहिजे. त्याची अत्यंत आवश्यता आहे" ( पृ. ९३८-३९ ).

म्हणून धान्य पुरवठ्याची आणि आगबोटीची व्यवस्था करण्यास ब्रिटिश पंतप्रधानांची अमेरिकन प्रेसिडेंटला नम्र आणि आग्रहाची विनंती आहे.

पण त्याच अमेरिकनांची कुचेष्टा करण्याचा मोह फील्ड मार्शल वेव्हेलना देखील आवरला नाही. त्यांनी एमरींना गुप्त खलित्यांत लिहिले:–

> आसाम रेल्वे अमेरिकनांनी चालवायला घेतली त्यास काही महिने झाले. पण तेवढ्या अवधीत ३३ वेळा गाड्या रुळांवरून घसरल्या; ६ टकरा झाल्या..... कॉंग्रेस चळवळ्यांनी रेल्वेचे नुकसान करण्यासाठी स. १९४२ मध्यें फक्त ६ वेळा गाड्या रुळांवरून घसरविल्या होत्या ( पृ. १२२१ ).

* * * *

हिंदी उद्योगपतींना आणि कांही शास्त्रज्ञांना इंग्लंडची सफर घडवावी; त्याना ब्रिटिश लोकांची ओळख थोडी अधिक व्हावी, म्हणून योजना होत होती. शास्त्रज्ञांना अमेरिकेतही हिंडवून आणावे असादेखील बेत होता. या सर्व प्रकारात ब्रिटिश राजघराणेही सामील होते. कुणा कुणाला राजवाड्यांत खान्याला बोलवावे; ही चर्चा चालू झाली. तेव्हा लेडी कॉलव्हिलना राजमातेचे पत्र आले की टाटा आणि बिर्ला या दोघांपैकी मी कुणाला बोलावू ? टाटा म्हणजे जे. आर. डी. आणि बिर्ला म्हणजे जी. डी. एवढा महत्त्वाचा प्रश्न दिल्लीत व्हाइसरायांपर्यंत पोचला. आणि वेव्हेलनी मग एमरींना कळविले :

> राजमातांना बिर्लांचे बोलणे आवडेल. टाटांचे शिक्षण चांगले झाले असले तरी मला ते मितभाषी वाटले. सगळीच श्रीमंत मंडळी अशी असतात. बिर्लांचे तसे नाही. त्यांचा स्वभाव खूप बोलका आहे. मारवाड्यांबद्दल कांहीही ( गैर ) समज असला तरीही बिर्लांचें

बोलणे राजमातांना खास आवडेल. म्हणून मला वाटते की टाटांबरोबरचा राजमातांचा खाना कंटाळवाणा होईल. बिर्लाबरोबरच्या खान्यात त्यांना विशेष गोडी वाटेल. (पृ. १०२१)

* * * *

ब्रिटिश राजकारणाचे बहुरंगी, बहुढंगी रूप या पत्रव्यवहारात उत्तम प्रकारे चित्रित झाले आहे. शासकीय कर्तव्यदक्षतेचा आदर्श यांत दिसतो तसा अन्यत्र आढळणार नाही. कारभाराची शिस्त, सर्वांनी मिळून राष्ट्रहित साधण्याची, जोपासण्याची तळमळ, या पत्रव्यवहारात छान प्रकट झाली आहे. इंग्रजी गद्याचा हा आविष्कार हृद्य आहे, वाचनीय आहे, अभ्यसनीय आहे. आमचे इंग्रजी हे काही झाले तरी "कसरत" आहे– स्वाभाविक "राणीचे" इंग्रजी हे असे असते, असे समजण्यास एक व्यापक आदर्श अशा ग्रंथराजामुळे उपलब्ध झाला आहे. संपादनदेखील नमुनेदार आहे– म्हणून राणी सरकारच्या ह्या प्रकाशनाची एवढी प्रशंसा.

– श्री. रा. टिकेकर



अनुक्रमणिका

# दर्जेदार किर्लोस्कर एंजिनांना भारतीय मानक संस्थेचे प्रमाण पत्र

५ ते ८ हॉर्स पॉवर













प्रथम पासूनच किर्लोस्कर एंजिने त्यांच्या उत्तम दर्जाबद्दल प्रसिद्ध आहेत.
देशातील आणि परदेशातील असंख्य शेतकरी व इतर ग्राहक यांच्याकडे वापरात असलेली एंजिने हे याचे प्रतीक आहे.

आतां भारतीय मानक संस्थेने (ISI) देखील प्रमाणपत्र देऊन, हे मान्य केले आहे.




किर्लोस्कर एंजिन – शेतकऱ्याची पहिली पसंती

**किर्लोस्कर ऑईल एंजिन्स लि.**

१३, लक्ष्मणराव किर्लोस्कर रोड, खडकी, पुणे ३

® एंजिनसाठी किर्लोस्कर ऑईल एंजिन्स् लिमिटेड यांनी या ट्रेडमार्कच्या उपयोगाचा अधिकार नोंदविलेला आहे.

Tom & Bay/KO-7315-M

अनुक्रमणिका




